जितजाह्मलानृपवर॥ बोलावीप्रधानासी॥ ३५॥ मालती जाह्मलीवराजोगी॥ तो वराविचारावायथायोगी॥ आह्मासमतुल्यजगीं॥ कीर्तिघोषज्याचा॥ ३६॥ प्रधान- ह्मणेजीराजा॥ वरविचारनवोजा॥ पाच्यारून्नियांद्विजा॥ मुहूर्तबर वाविचारा॥ ३७॥ तंवनिघालातात्काळ॥ आदितवार हस्तनिर्मळ॥ त्रयोदशीजाह्मलीयाप्रातः काळ॥ अमृतसिद्धियोगबर वा॥ ३८॥ इतुकेंद्विजबोलिला॥ रायेंप्रधानासिनिरोप दीधला॥ तोआपलेंस्वगृहासीआला॥ सारीआरोगणासी॥ ३९॥ तेनिशीतंवक्रमि ली॥ पूर्वदिशाउजळली॥ सूर्योदयाकाळीं॥ प्रयाणकरितजाह्मला॥ ४०॥ निघा लाउत्तरदिशेसी॥ हिंडतगेलाब्रह्मपुरीसी॥ जाऊनभेटलारायासी॥ रावभेटलाप्री तीनें॥ ४१॥ करीषोडशोपच्यारीपूजा॥ नम्रउत्तरींपुसेराजा॥ अंतरभाववोजा॥ सांगावाह्मणतसे॥ ४२॥ प्रधानसांगेवृत्तांत॥ राजाह्मणतसेएकअसे आमचासु त॥ जरीतुह्मावाटेलहितार्थ॥ तरींमानसिआणिजे॥ ४३॥ येरूह्मणेबोलावा जीत्वरित॥ रायेंपाठऊनिपुरोहित॥ घेवूनिआलानृपसूत॥ अतिसुंदरसकळलक्ष ण॥ ४४॥ प्रधानलक्षीलक्षण॥ तंवतोसर्वगुणीसंपूर्ण॥ देखूनिआनंदलेंमन ॥ प्रधानाचेंतेधवां॥ ४५॥ नवराआलाविचारासी॥ परस्परेंसागतीनक्षत्रांसी ॥ वृत्तीसगुणदोषांसी॥ घटितार्थनिघाला॥ ४६॥ वैशाखशुद्धपंचमीसी॥ ल

गनधरिलेंनिर्धारेंसी ॥ करूनियाशब्दनिश्चयासी ॥ प्रधाननिघताजाहाला ॥ ४७ ॥
आलाआपुल्यानगरासीं ॥ वृत्तांतसांगीतलाकाशीश्वरासी ॥ ह्मणेउत्तमनवराब्र
ह्मपुरीसी ॥ रायाचापुत्रसुलक्षण ॥ ४८ ॥ राजाआनंदलामानसीं ॥ निरोपदिधलाप्र
धानासी ॥ कराह्मणतीसामग्रीसी ॥ नकरावाविलंब ॥ ४९ ॥ हीऐकूनियांमात ॥ मा
लतीससांगेसुमंत ॥ ह्मणेपणगेलातुझाव्यर्थ ॥ वरनिर्धारब्रह्मपुरीं ॥ ५० ॥ मालती
ह्मणेसुमंतातें ॥ तुवांनधरावेंसंशयातें ॥ म्यादेहअर्पिलातूतें ॥ हेंअन्यथाकेवींहोई
ल ॥ ५१ ॥ जंवलग्नसमईयेईलवर ॥ तंववरीधरावाधीर ॥ नकरीअन्यत्रविचार ॥
दृढहोऊनिराहावें ॥ ५२ ॥ इतुकाएकांतकेला ॥ पुढेंकायविचारघडला ॥ तोसांगि
जेवहिला ॥ कृपाकरूनिस्वामियां ॥ ५३ ॥ सकळसामग्रीकेलीउभयतां ॥ रायासमु
ळपाठविलेंसमस्त ॥ इष्टमित्रस्वकुळसहितां ॥ बोलावितांजाहाला ॥ ५४ ॥ उभारि-
लायज्ञमंडप ॥ देशोदेशींचेआलेनृप ॥ वऱ्हाडमिळालेअमुप ॥ वाजंतरेंगर्जती ॥
५५ ॥ ठाईठाईनृत्यांगनानाचती ॥ याचकजनानाहींमिती ॥ ब्राह्मणवेदमूर्ती ॥ म
हातपस्वीनृपवर ॥ ५६ ॥ तंववऱ्हाडीआलेअसंख्यात ॥ रथकुंजरालानाहींनीत
॥ पायभारानाहींगणित ॥ वाद्येंकरूनगगनगर्जे ॥ ५७ ॥ उत्तरलेनगराबाह्यप्रदे-
शीं ॥ ठाउकेंजाहालेंकाशीश्वरासी ॥ राजानिघालावेगेंसी ॥ सीमंतपूजाघेवूनि

५

॥५८॥ जाहाली सेवनी रुखवत॥ वरपूजा करी नृपनाथ॥ नगरींप्रवेशलेत्वरित ॥जानवसा दिधला॥५९॥ कमिलीयेथेंनिशी॥ देवकस्थापन दुसरे दिवसीं॥ ऐसें लग्ननिर्धारेसी॥ रात्रीं घटिकासोळांचें॥ ६०॥ जाहाला असे सायंकाळ॥ राजानि घालावरासि मूळ॥ नगरनारी तंव सकळ। मिरवत निघाल्या॥ ६१॥ नोवरी गोरी हु-रा बैसली॥ घरचीं अवघीं निद्रिस्त जाहालीं॥ मालती काय करी तेवेळीं॥ तें अपूर्व-परिसा॥ ६२॥ राजा जात असे मिरवत॥ कोण्हीं कोण्हीं नोळखत॥ माघारा फिरला सुमंत॥ आपुल्या राज्यमंदिरीं॥ ६३॥ मालती होती गोरी हरीं॥ तें उठूनि आली बाहे रीं॥ सुमंतासी खुणें पाचारी॥ तो हा आला समीप॥ ६४॥ ह्मणे आतां करावेग॥ अ श्वशाळेसी असे तुरंग॥ द्वादश योजनें चाले मार्ग॥ येक्या मुहूर्तामध्यें॥ ६५॥ तो जाय आण झडकरी॥ येरु निघाला भिनरीं॥ पाल्हाणुनी नये अवसरीं॥ शीघ्र घेवूनि आला पें॥ ६६॥ घेतलीं वस्त्रें अलंकार॥ रत्नें जडीत मनोहर॥ दोघे चढूनी तुरंगावर ॥ नगराबाहेर पैं आले॥ ६७॥ वेगीं आले आम्रवनांत॥ तंव वर्ते लीं विपरीत॥ नवरत्ना चा हार त्वरित॥ गोरीहरीं राहिला॥ ६८॥ ह्मणे विसरलें पें हार॥ नवरत्नाकार मनो हर॥ सुमंत ह्मणे नावेक होई स्थिर॥ तंव मि हार आणितों॥ ६९॥ येरी ह्मणे पाडला अंधकार॥ नेणात आला जरी तस्कर॥ येरु ह्मणे मी करीन हुंकार॥ खुणा निरुती-

जाणपें॥ ७०॥ ऐसें ह्मणूनि निघाला॥ राजमंदिरीं प्रवेशला॥ गौरीहरींचा हार घेत
ला॥ तेथूनि निघाला पवनगती॥ ७१॥ तंव येथें काय वर्तला विचार॥ आम्रझाडींत
होता तस्कर॥ तेणें ऐकिला शब्दगजर॥ उठूनि आला अश्वाजवळी॥ ७२॥ अश्वें तस्क
र देखिला॥ कान मेटावूनि हंकारिला॥ तंव तस्कर हुंकारला॥ येरी ह्मणे बैसा तुरंगीं॥
७३॥ रात्र पडली काळी रवी॥ कोणही कोण्हा नोळखवी॥ मालती मनीं शंका लेखवी॥ रा
त्रीं बोलूं नये वचनासी॥ ७४॥ वारू जात असे पवनगती॥ दरीदरकुटें लंघिती॥ तंव
अरुणोदयाचे अंतीं॥ पूर्वदिशा उजळली॥ ७५॥ नानापरिचे विहंगम॥ परस्परें बो
लती उत्तम॥ तो आयकूनि अनुक्रम॥ मालती बोले तस्करासि॥ ७६॥ बोले भाषा सं
स्कृती॥ तस्करा नकळे मती॥ ह्मणवोनि होय अवलोकिती॥ फिरूनि वदन पाहे
त्याचें॥ ७७॥ जंव अवलोकी वदन॥ तंव न देखे नासिककर्ण॥ येक हस्त गेला छेदून॥
मणगटापासोनियां॥ ७८॥ दिसे कर्कोटक काळा॥ जीव थोर कंटाळला॥ जरी कां
हीं करीन चाळा॥ तरी हा मारील॥ ७९॥ जिवीं धरूनि दृढभाव॥ यासि कांहीं करा
वा उपाव॥ जेणें तुटे संबंधभाव॥ या तस्कराचा॥ ८०॥ उदय जाहाला दिनकरासी
॥ तंव पुढें देखिलें नगरासी॥ चोर ह्मणे मालतीसी॥ ये नगरीं वस्ती आह्मा असे॥
८१॥ चला आमुच्या मंदिरा॥ स्मरवें चालवी घराच्या वारा॥ मालती ह्मणे गा तस्करा॥ ऐ

कमाझें वचन॥ ८२॥ दिवसा जरीं नगरांत जाशील॥ राजदूत जरीं देखतील॥ एखा
दा अनर्थ होईल॥ मजनें नेलाहि रोनियां॥ ८३॥ नृपावशील बंधन॥ ऐहिकनापर
त्रजाण॥ माझें भाग्य गहन॥ तुजसारिखा नामिळे॥ ८४॥ नेंमान लेंतस्करासी॥
म्हणे चाल जाऊं मक्मासीं॥ तेथें कमूनि यादिवसासीं॥ सायंकाळीं नगरासीं जा
ऊं॥ ८५॥ माळियाचे संवटीं॥ उतरली वापीच्या कांठीं॥ वारू बांधिला निकटीं॥ शु
ष्मासिपें॥ ८६॥ काढिल्या सुवर्णमोहरा॥ त्या दीधल्या करीं तस्करा॥ जाऊनि भित
रीं नगरा॥ सामुग्री आणी स्वयंपाका॥ ८७॥ तो निघाला त्वरित॥ गेला असे नग
रांत॥ सामग्री घेतली समस्त॥ स्वइच्छें करूनियां॥ ८८॥ युक्ति एका मालतीची॥
अवगणिपकां इली स्त्रीपणाची॥ वस्त्रें हातीं सुमंनाचीं॥ तीं केलीं परिधान॥ ८९॥
आरूढ होऊनि वारूसीं॥ जात असे वालवेगेसी॥ लोंधनागारिकं दरासी॥ गेली
चोवीस योजनें॥ ९०॥ मागें धरूनि सामर्थ्यानें॥ तस्कर आला असे त्वरित॥ तंव न
देखे स्त्री आणि वारू तें॥ दुःखें देह धरणीवरी टाकिला॥ ९१॥ म्हणे आहा वोख
टें जाहालें॥ कैसें निधान हातींचें गेलें॥ अमयत्नें हातें साधिलें॥ मजानें दैवा केंवि
जिरेल॥ ९२॥ मुक्तामाळा मर्कटासी॥ मिष्टान्नभोजन गर्धभासीं॥ रत्नदीप उज-
ळिला अंधापासीं॥ बधिरासी केंवीं म्हासहरिकथा॥ ९३॥ मूर्खासी सांगे शास्त्र॥

भ्भास ॥ तयासिनकळेलयाचाअंश ॥ तैसामी अभाग्यविशेष ॥ केवींपावेंस्थीर
त्व ॥ ९४ ॥ ह्मणूनिजाहालावैरागी ॥ वस्त्रेंकेलींविरंगी ॥ लागलाएकेमार्गीं ॥ तीर्थ
क्षेत्रींहिंडतसे ॥ ९५ ॥ ह्मणेंह्याचमार्गउत्तम ॥ वैराग्यपरमउत्तम ॥ जटाधारिमी-
निःसीम ॥ पंथह्याचानिर्धार ॥ ९६ ॥ इकडेवारूवारूढमालती ॥ जातअसेपवनग
ती ॥ पुढेंकैस्सीवर्तलीस्थिती ॥ तिऐकेंराया ॥ ९७ ॥ उत्तमसरोवरीठाव ॥ तेथेंअसे
मानभाव ॥ तयाचापुरलाआयुर्दाव ॥ पावलामृत्युतें ॥ ९८ ॥ गुरूच्यातीनअसती
वस्तु ॥ त्यानयेतीवांटिता ॥ ह्मणोनकारितीविवादकथा ॥ तंवमार्गीघोडेस्वारभे
टला ॥ ९९ ॥ ह्मणेंपैलयेतांआरूढोनिनर ॥ तयासिसांगोंहाव्यव्हार ॥ तोसांगे-
लह्याविचार ॥ तोअंगिकारूंदोघेजण ॥ १०० ॥ तंवतोआलासमीपता ॥ सांगित
लीअवघीसमूळकथा ॥ स्वारह्मणेकोठेंआहेतवस्तु ॥ त्यामजदाखवावो ॥ १ ॥
येरींकंथाठेविलीत्वारित ॥ पादुकाआणिपात्र ॥ सांगतीतुह्माविचित्र ॥ भावयाव
स्तूचा ॥ २ ॥ तेशिष्यह्मणतीभावार्थेवचन ॥ याचेंषोडशोपचारेंकरावेंपूजन ॥ पा
त्रेंषड्रसअन्न ॥ मसवेलजी ॥ ३ ॥ कंथादेईलकनकरासी ॥ बहुद्रव्यभांडारासी
॥ पादुकानेतीचिंतिल्याठायासी ॥ नलागतांक्षणयेक ॥ ४ ॥ यासीएकअसेभमा
ण ॥ जरींकरालदोघेजण ॥ तेमानितितयाचेंवचन ॥ ह्मणेकरावेंआज्ञेसी ॥ ५ ॥

स्वारेंकेलेंअनुमान॥ वृक्षलक्षिलाकोशप्रमाणें॥आधींजोयेईलसिवोन॥त्या
नेंदोनवस्त्राघेइजे॥ ६॥ वस्त्रांटेवूनितयापासीं॥ दोघेहीधांवघेतीत्वरेसीं॥ झा
डासमीपवेगेंसीं॥ तंवकायकरीघोडेस्वार॥ ७॥ वस्त्राघेवूनियादृढ॥ होवूनि-
यांअश्वारूढ॥ लंघूनिगेलाअसेदृढ॥ पंचदशयोजनें॥ ८॥ धांवताजाहालाअ
तिश्रम॥ परिनसांडिपराक्रम॥ शिवूनियांद्रुम॥ एकामागेंएकपरतले॥ ९॥ वे
गेंआलेत्याठायांसीं॥ नदेखतीवस्त्राआणित्यास्वारासी॥ म्हणतीठकविलें
दोघांसी॥ अवलोकितीदाहीदिशा॥ १०॥ म्हणतीदोघांसीभांडतां॥ तिसरि
यालाभजाहालाअवचिता॥ नीतीबोलतीवेदार्था॥ तेंयथार्थचिघडलें॥ ११
॥ समुद्रमंथनींदेवआणिदैत्य॥ लक्ष्मीकारणेंविवादत॥ शेवटींकोण्हानव्हेमाम॥
विष्णुघेऊनिगेला॥ १२॥ रामआणिरावण॥ दोघांसंग्रामजाहालाजाणां॥ लंकाप्रामवि
भीषण॥ चिरंजीवहोवूनिठेला॥ १३॥ तैसेंआम्हासिजाहालें॥ रत्नतिसऱ्याचेंहातां
सिगेलें॥ तेंस्थळत्यागितजाहले॥ दोघेगेलेदाहींकडे॥ १४॥ राऊनजातंअसेंमनां
वेगें॥ पाहातसेपुढेंमागें॥ तोंपुढेंदेखिलेंप्रसंगें॥ शिवस्थानउत्तम॥ १५॥ तेथेंनाव
कस्थिरावला॥ शिवासिप्रणिपातकेला॥ तंवसायंकाळजाहाला॥ तेथेंक्रमिलीनि
शी॥ १६॥ उदयजाहालादिनकर॥ प्रयाणकरूनिचालेपुढार॥ देवदेखताजाहाला॥

नगरा ॥ तथें अपूर्व वर्तलें ॥ १७ ॥ तथील राजा पुष्पमणी ॥ तो मृत्य पावला दैवकरणीं ॥
राज्यासि नाहीं कोणी धनी ॥ बंधु अथवा पुत्र पैं ॥ १८ ॥ प्रधानें केलें क्रियाकर्म ॥ जो जो
चालिला होता धर्म ॥ तो तो करूनियां नेम ॥ सद्गती सी पावविला ॥ १९ ॥ प्रधान चतुर मि
ळोनी ॥ विचार करिती बैसूनी ॥ ह्मणती राज्यास पाहिजे धनी ॥ तो प्रकार योजावा ॥ २०
ज्येष्ठ मंत्री बोले वचन ॥ मज कळतसे ज्ञान ॥ श्रुतिशास्त्राचें वचन ॥ ऋषिमुखीं होएं कि
लें ॥ २१ ॥ हस्तिनीची पूजा करावी ॥ शृंगारूनि बरवी ॥ पुष्पमाळा सुंडेंत द्यावी ॥ ते हिंडवा
वी नगरांत ॥ २२ ॥ येईल तिच्या चित्तासी ॥ माळ घालील तयासी ॥ तो चि धनी राज्यासी
॥ सत्य जाणावा ॥ २३ ॥ तें मानलें अवघियातें ॥ तत्क्षणीं आणिलें हस्तिनीतें ॥ पुजूनियां
त्यियेतें ॥ सुखीं पुष्पमाळा दीधली ॥ २४ ॥ लागला वाजंत्र्यांचा गजर ॥ पाठसी चालला
दळभार ॥ अस्तमानवरी घाली फेरी ॥ नगरामध्यें पैं जाण ॥ २५ ॥ नगरजन सिद्ध होवूनी
॥ त्याले लुगडीं लेणीं ॥ माळ घालिल हस्तिनी ॥ ह्मणूनियां धांवती ॥ २६ ॥ ऐसी तीन
दिवस हिंडविली ॥ माळ कोण्हासी न घाली ॥ चौथ्ये दिवशीं बाहेर आली ॥ तंव मालती
येत असे समोर ॥ २७ ॥ दोघां जाहाली नगरद्वारीं भेटी ॥ माळ घातली अश्वारूढ कं
ठी ॥ उचलूनि बैसविला पृष्ठीं ॥ मिरवला असे नगरांत ॥ २८ ॥ वाजंतरीं गगन गर्जत
॥ मंत्रिजन नाव पुसत ॥ सुमंत राजा हो ह्मणवित ॥ वाजविल्या दुंदुभी ॥ २९ ॥ सिव्हा

सनींबैसउनी ॥ पट्टाभिषेककेलाप्रधानीं ॥ नमस्कारकेलासकळजनीं ॥ ह्मणतीराजादि
सेपुण्यपरायण ॥ ३० ॥ नगरींपिटिलादांगोरा ॥ सुमंतरायाची आज्ञाकरा ॥ धर्मदानय
थाविधीकरा ॥ याचकजनासी ॥ ३१ ॥ अठराकारखानेंसावधान ॥ किल्याकुल्पेंविचक्ष
ण ॥ तंवदिनगेला अस्तमाना ॥ सभाविसर्जनकेलेंअसे ॥ ३२ ॥ क्रमिलीतेनिशी ॥ उदय
जाहालादिनकरासी ॥ मंत्री आलेपारिवारेंसी ॥ करितीसाष्टांगनमस्कार ॥ ३३ ॥ राजा-
विचारीमनीं ॥ सुमंताचिकेसीकरावीशोधणी ॥ तंव आठवलेंमनीं ॥ तें अपूर्वपरियें-
सा ॥ ३४ ॥ ह्मणेकरावें अन्नदान ॥ सुखीकरावेंयाचकजन ॥ आणिघडेलब्राह्मणसं
तर्पण ॥ तेंपुण्यअगाधअसे ॥ ३५ ॥ रावसांगेप्रधानासी ॥ घालावें अन्नछत्रासी ॥
जेऊंघालूनित्यासि ॥ विद्यासमजजवळी आणावें ॥ ३६ ॥ नडीतापडीश्रमणंजजो-
गी ॥ जंगमअथवामलंगी ॥ महंतऋषीभेटेलमार्गी ॥ तितुकेही आणावे ॥ ३७ ॥ आ
सुचादेशजेथवरी ॥ तेथेंठेवावेंभेटकरी ॥ त्याणीआणावेनिर्धारीं ॥ अन्नछत्रासी ॥
३८ ॥ प्रधानआज्ञापरियेसी ॥ अन्नछत्रनिर्मिलेंनेमेसी ॥ जेवूंघालूनिसंतोषी ॥ वि
ड्यादेतनृपवर ॥ ३९ ॥ इतुकेंनेथेंवर्तलें ॥ तिकडेसुमंतेंकायकेलें ॥ तेंसांगावेंवाहिलें ॥
हरिदासा ॥ ४० ॥ इतिश्रीविक्रमचरित्रकथा ॥ हरिदासह्मणेसांगता ॥ तेऐकावीश्रो
ता ॥ स्वस्थचित्तेंकरूनियां ॥ ४१ ॥ इतिश्रीविक्रमचरित्रेप्रसंगसातवा ॥ ७ ॥ श्रीराम

श्रीगणेशायनमः॥श्रीसरस्वत्येनमः॥श्रीगुरूभ्योनमः॥ह्मारघेवूनिसमंत॥सत्वरआ
लाआम्रवनांत॥मालतीसीअसेपाह्मात॥स्वूणपाहेवारूची॥१॥असोसमस्तवनींहिंड
ला॥झाडोझाडींधांडोळाघेतला॥परीनेदेरवेवल्हाळा॥मनींजाहालाविस्मित॥२
ह्मणेमजसीकेलीरव्ळी॥कींफिरूनिनगरांतगेली॥कींवानरकरावरपडजाहाली॥हेंम
जलागींतर्केनां॥३॥तंवराग्रजाहालीमध्यान्हीं॥गलबलाहोईलराजभुवनीं॥सत्व
रपाठवीलधावणीं॥येरवादाअनर्थहोईल॥४॥ह्मणोनिचालिलाउत्तरदिशेसी॥
हारधरिलासेजिवासी॥जातांउदयजाहालादिनकरासी॥कायकरीतयेवेळीं॥५
वर्स्त्रेकेलींभगवीं॥वेशघेतलामानभावी॥निराहाराजिवीं॥स्मरणकरीमालतीचें
॥६॥करितांपृथ्वीपर्याटण॥भेटल्यातीर्थीकरीस्नान॥ऐसेंवनोवनींकरीभ्रमण॥
करीस्मरणमालतीचें॥७॥मागीलनगरींचासमाचार॥तोराहिलाअसेसविस्त
र॥तोऐकासमाचार॥सावधानहोवोनि॥८॥समंतघेवूनिगेलाहार॥सेवतीस्व
वताअवसर॥आरूढकरूनियांवर॥आणिलामंदिरासी॥९॥बैसकारजाहालाव
ऱ्हाडियांसी॥अतिसमयह्मणतीज्योतिषी॥वरपूजाकरूनित्वरेसी॥ह्मणतीकरा
कन्यापूजन॥१०॥नवरीसआणाह्मणती॥हूजमालतीसपाहाती॥माताह्मणेगौरी १
हरापती॥निद्राकेळीअसेल॥११॥पाहातीजंवगौरीहरीं॥तंवतेथेंनाहींतेकुमारी॥गृ

हेंपाह्मिलोंसेजारीं॥ परिकोठेंनादिसे॥ १२॥ सत्रपाडिलोकमळरूपी॥ दिसट्यालाउनी साक्षेपी॥ शोधितीआडआणिबापी॥ पडलीअसेलह्मणोनि॥ १३॥ राजाबह्मणीनें पुसे॥ तुझाकुमरकोठेंअसे॥ येरीह्मणेआजिनादिसे॥ तयासिकरीधांडोळा॥ १४ ॥ पाहिलेंअवघेंनगर॥ पाहिलेंअवघेंधवळार॥ सकळबोलतिउत्तर॥ सुमंतनेली-ऐसेंतर्केनसे॥ १५॥ रायासिराणीबोलतसेवचन॥ मागेंएकिलीहोतीगुणगुण॥ एकावेगळीएकक्षण॥ नराहोतीदोघेंही॥ १६॥ सुमंतगेलाजरीबाहेरी॥ मालती नराहेक्षणभरी॥ देखवेनादोघांचिपरी॥ आह्मासिनकळेची॥ १७॥ नजरेवीनयाचि ण॥ मागेंपाहिलसलक्षन॥ त्याचेंकरीअवलोकन॥ मगसारिआरांगणा॥ १८॥ दोघेंबैसूनएकांतीं॥ नेणोंकायगोष्टीकरिती॥ एसीवरउडांपडलीत्यांनी॥ चरित्रन कळेतयांचें॥ १९॥ राजाअतिकष्टीजाहाला॥ ह्मणेपांसयाउपकारकेला॥ बाह्मणी वासंशायधरिला॥ तुजविरहितकार्यनव्हेहें॥ २०॥ तेंप्रमाणअसेनदत्त॥ मजजरीं असेलसुत॥ तरीईश्वरकरीलविपरीत॥ आनांचीमजलागीं॥ २१॥ करीलागनीउ ठला॥ ह्मणेकायकरींनारायणा॥ मालवीतहोतेरांडपणा॥ तयावरीचित्तठेवूनियां॥ २२॥ थोरकेलीहोतीआस॥ तंवदेवेंकेलेंनिरास॥ जन्माचेंक्लेशयासमयास॥ व्यर्थगे लेमाझेपें॥ २३॥ माझ्यादैवाचीउणिवजरीं॥ तेणेंहेंधारिलीनत्वपायरी॥ काळकमि

तांबंधुचेघरीं॥विघ्नकैसेंवोढवलें॥२४॥ज्याचेघरींतक्रासियावें॥त्याचेंवस्त्रमृतव्हा
वें॥ऐसेंकेलेंअसेदैवें॥मजलागींजाणपां॥२५॥तीनप्रकारघडले॥बंधुमानसींवैर
जाहालें॥मजलागींकष्टीकेलें॥आपणसेविलाप्रवास॥२६॥ऐसाशोकसांगतां॥वि
स्ताराजाईलकथा॥पुढेंनृपजाहालाविचारकरता॥तेंऐकावेंसकाळिकीं॥२७॥मा
लिनीधाकुटीकन्याहोती॥तेआणविलीशीघ्रगती॥मंगळस्नानवेदोक्तीं॥कर-
वितीकन्यापूजन॥२८॥घटीकाजालीअसेपूर्ण॥अंतरपटधरूनिलावितीलग्न॥
मंत्राक्षनाटाकितीब्राह्मण॥लग्नसिद्धीपैंजाहाली॥२९॥चारिदिवसक्रमिले॥वरा
न्नचतुर्थकर्मकेलें॥रायेंआंदणसमर्पिलें॥हस्तीआणितुरंग॥३०॥वस्त्रेंआणिभूष
णें॥दासीह्मैसीगोधनें॥ग्रामपुरेंनंदवनें॥देताजाहालानृपवर॥३१॥वऱ्हाडनिघा
लेंआपुलियानगरासी॥रावबोळवीतयासी॥देशोदेशींचेरायांसी॥गौरवूनिबोळ
वी॥३२॥काशीश्वरराज्यकरी॥बहिणीचेंसमाधाननानापरी॥त्यांचीजाहालीभ्रा
चीनापरी॥तुवांचिंतानकरावी॥३३॥जंववरीअसेलप्राण॥तंववरीअन्नवस्त्रचा
लवीन॥मनकरूवेंसमाधान॥काळानुसारक्रमंतभेटे॥३४॥मगराहिलीनीवांत
॥मार्गीक्रमंतअसेहिंडत॥तीर्थक्षेत्रेंहींअसेक्रमित॥पंचसप्तरात्रठांईठाईं॥३५॥
२
घनेंदुर्घटक्रमितां॥पावलासिंव्हाद्रिपर्वता॥होवूनिस्वइच्छेंसुरूपात॥नमस्काररिरेणुके

सी॥ ३६॥ नमूनियांदत्तात्रयानें॥ नवरात्रक्रमिलें तेथें॥ तंव आकाशवाणी वदली अ
कस्मात॥ जे मालती भेटेल तुतें॥ ३७॥ मग तेथूनि निघाला॥ वोढ्या जगन्नाथासि आ-
ला॥ रामकृष्णास्मरों लागला॥ तेथें राहिला पंचरात्र॥ ३८॥ असतां तया जगन्नाथीं॥ त
स्कर आला तीर्थामती॥ दोघां पडली संगती॥ मग तेथें विराहिले॥ ३९॥ नित्य सारिती
संध्यास्नान॥ देवाचें करिती दर्शन॥ एक संवत्सर पूर्ण॥ तेथें जाण क्रमिला॥ ४०॥ तं
व कोणे येके दिवसीं प्रभातवेळा॥ तस्कर बाहिर्भूमीस होता बैसला॥ तयापुढें आंबा-
पडिला॥ त्याणें मुखें घातला असे॥ ४१॥ आंबा असे चोरिवन॥ तें देखत सेस्कमंत॥ म-
नीं विस्मय असे थोर करित॥ तया मनि काय वर्तलें॥ ४२॥ नूतन संन्यासी ह्मणविसी॥
आणि आंबा अशोचें स्वासी॥ बोलला विलाभ गावियासीं॥ व्यर्थ संन्यास घेतला ४३
तस्कर ह्मणे गायुक्ती॥ एक माझी विनंती॥ शास्त्रीं आहे निती॥ ते तुज मती सांगेन॥
४४॥ ॥ श्लोक॥ ॥सिद्धमन्नं फलं पक्कं नारी प्रथम यौवनं॥ कालक्षेपो न कर्तव्यः शीघ्रं
गृह्णंति पंडिताः॥ ४५॥ सुमंतें श्लोकाचा अर्थ पाहिला॥ ह्मणे ह्या कोठें असे ठकला॥
मग तयासी पुसता जाहाला॥ अति आदरें करूनियां॥ ४६॥ त्याणें सांगीतला वृत्तांत-
संपूर्ण॥ ह्मणे हा नीचिं गेलें स्नान॥ ऐसें घडेल प्रमाण॥ ह्मणूनि आंबा भक्षिला॥ -
४७॥ आयकून तयाचीं वचनें॥ ह्मणें मालती नें त्यजिलें मज कारणें॥ जीं जीं बोलिलीं

च० ३ होतींवचनें॥ तेसर्वसत्यपदार्थ॥ ४८॥ फिरूनिनाहींगेलीनगरांत॥ मातापितात्य- अध्या ८
जिलानेमसत्य॥ तस्करेंकेलायेव्हडाअनर्थ॥ तोहीत्यजिलाकोणेबुद्धी॥ ४९॥ तस्करेंविचा
रिलेंमानसीं॥ हाउग्रअसेतापसी॥ एकेठायींबैसूनयेयापासीं॥ ह्मणऊनिकरीप्रयाणपैं॥
५०॥ निघालाहिंडतहिंडत॥ तंवपातलाअन्नछत्रांतें॥ तेथेंजेविलासंतृप्तें॥ विडयासीगे
लारायाजवळी॥ ५१॥ विडादेतांतयासी॥ रायेंबोळाविलेंतस्करासी॥ तूंकार्यनिमित्यजा
हालासितापसी॥ हेंमजप्रतिसांगपां॥ ५२॥ तोगुळमुकूंलागला॥ रायेंवचनींतांडला
॥ मगसांगोंलागला॥ यथाविधीविवंचना॥ ५३॥ ऐकूनियांरावहांसे॥ त्वांतिलासोडिलें
कैसें॥ जन्मदरिद्रासीपरिसें॥ कैसेनेंग्रासहोय॥ ५४॥ राजाह्मणेतस्करातें॥ वृथाकष्टवि
सीदेहातें॥ अन्नछत्रींजेऊनियेथें॥ राहावेंसुखें॥ ५५॥ ऐकूनतयाचेंउत्तर॥ अन्नछ-
त्रींराहिलातस्कर॥ राहिलासुमंनाचासमाचार॥ तोसांगरेहारिदासा॥ ५६॥ जगन्ना
थींक्रमिलेबहुदिवस॥ तेथूनिबिजेंकरीतापस॥ हिंडतांहिंडतांपुष्पावतीस॥ नगरासी
येताजाहाला॥ ५७॥ नगरासांडूनिमायारा॥ सुमंतगेलापुढारा॥ भेटकरीह्मणतीश्व
रीश्वरा॥ नावरूअन्नछत्रासिचलावें॥ ५८॥ दूतह्मणतीस्वामियां॥ आह्मासीअसेरा
जआज्ञा॥ नजेवितीयाठायां॥ नजाऊंद्यावा॥ ५९॥ तरीचलावेंतेथवरी॥ आह्माकार
णेंकृपाकरी॥ भोजनअन्नछत्रींसारी॥ विडादेईलनृपवर॥ ६०॥ सुमंतह्मणदूतासी

॥आह्मीनिराहारसंन्यासी॥ नघेऊंअन्नछत्रासी॥ चाडनाहींअन्नाची॥ ६१॥ नेक
रितीबहुतविनवणी॥ कांहींकोल्यानाईकेमनीं॥ बलात्कारें न्यावाधरोनी॥ तरीराजा
कोपेल॥ ६२॥ आणिशापदेईलसंन्यासी॥ मगमधुरवचनविनवितीत्यासी॥ जातु
तुह्मींश्रुतकरारायासी॥ तोंवरीआह्मीबैसतोंयेथें॥ ६३॥ दूतआलेत्वरित॥ रायासी
जाणवितीवृत्तांत॥ प्रधानासीरावह्मणत॥ तुह्मीजाऊनिआणात्यासी॥ ६४॥ प्र-
धाननिघालासत्वर॥ येवूनिनमस्कारिलायोगेश्वर॥ क्षणैकहोऊनियांस्थिर॥ ला
भदीजेआह्मासी॥ ६५॥ स्रमंतह्मणेप्रधानासी॥ अन्ननेमआहेआह्मासी॥ रया
मार्गेंस्वोळेबाविसी॥ निष्कारणप्रधाना॥ ६६ बहुतकेला आग्रह॥ परिनाईकेमहानुभा
व॥ थोरपडिलासंदेह॥ आतांकेसेंकरावें॥ ६७ मगविचारीमानसीं॥ बलात्काररकरू
नयेयासी॥ ह्मणेश्रुतकरूंरायासी॥ मगकरोमलनेपी॥ ६८॥ प्रधानह्मणेमहंतासी॥
हासमाचारसांगूंरायासी॥ तंववरीस्थिरकरूनिमानसीं॥ येथेंराहिलेंपाहिजे॥ ६९॥
तुह्मराजातुजयोर॥ मजनाहींहेंतंविचार॥ रंकआणिनृपवर॥ हेदोघेमजसमान॥ ७०
प्रधानह्मणेकृपामूर्ती॥ तुह्मासीमजबोलावयानव्हेशक्ती॥ माह्मीस्वामिसेवकाचीवि
नंती॥ ऐकतीकेलीपाहिजे॥ ७१॥ ऐसाशब्दमधुरवचनीं॥ शांतकेलानामुनी॥ मग
निघालातेथूनि॥ रायासिसकळश्रुतकेलें॥ ७२॥ राजाविचारीमानसीं॥ जाऊनया-

।·च· वासंन्यासी॥ ह्मणीहोईलसत्वासी॥ तोविन्मुखजाहालिया॥ ७३॥ तात्काळआ- अ
४ णविलावारु॥ वरीआरूढलानृपवरु॥ बैसलाहोतामुनीश्वरु॥ तयाठायांसीपैंआला ८
॥ ७४॥ रायेंमुखअवलोकिलें॥ समंतातेंवोळखिलें॥ मगदंडवतघातलें॥ साष्टांगेसीं
॥ ७५॥ उभाराहिलाकरजोडोनी॥ स्तुतीकरीनानावचनीं॥ ह्मणेजीआतांऐकाविनव-
णी॥ कृपाकरूनिचालिजेगृहा॥ ७६॥ येरुह्मणेगृहासीकायकार्यसांग॥ सकळअर्था
चाकेलात्याग॥ धरिलाअसेमार्ग॥ तोजाणेसर्वेश्वर॥ ७७॥ राजाह्मणेजीमहानुभावा॥ आ
जिचरणाचालाभधावा॥ मंजुळकरूनियांग्रीवा॥ करीनमस्कारतापसासी॥ ७८॥ चरण
धरिलेबळकट॥ माझेंवचननकरावेंस्पष्ट॥ तुमच्यामनींजेंअसेलउत्कट॥ तेहींसिद्धीपा
वेल॥ ७९॥ उचलूनबैसविलापालखीसी॥ घराआणिलासंन्यासी॥ आज्ञादीधलीसक
ळांसी॥ मगयेकांतीबैसले॥ ८०॥ राजाकरीविनवणी॥ कायनिमित्यधारिलीअवग
णी॥ तस्मात्कृपाकरूनि॥ सांगिजेमज॥ ८१॥ नधरावेंसंशयासी॥ श्रुतहोऊनदे
तीसरीयांसी॥ शब्दपुष्पींपूजोनितयासी॥ बोधविलाजाहाला॥ ८२॥ समूळअवघेंक
थियेलें॥ म्याजाऊनिहारासीआणिलें॥ खुणांच्याठाईंपाहिलें॥ तंवतेथेंनदेखेमालती
सी॥ ८३॥ मार्गलक्षितांचहूंकडे॥ हिंडतगेलोंझाडेंझुडें॥ जंवनगरींविचारावेंनि- ६
वाडे॥ तवप्रभातसमयजाहाला॥ ८४॥ मगनिघालोंतेथूनि॥ मार्गधारिलीहोतीअव-

गणी॥ बहुताठायांकेलीशोधणी॥ परीगांठीनपडेचि॥ ८४॥ मगनिघालोंतेथूनी॥ परीसंदेहअसेमनीं॥ मालतीगेलीपरत्तूंनी॥ नगरामध्यें॥ ८५॥ हिंडतांहिंडत॥ पावलों वोढयाजगन्नाथा॥ तेथेंभेटलाअतीत॥ त्याणेंतीचीखुणासांगीतली॥ ८६॥ तेणेंफिटला माझासंदेह॥ मातापितायांचासांडिलास्नेह॥ मजवरीधरूनियांमोह॥ निगांसेविलाम वास॥ ८७॥ राजाह्मणेंसुमंतासी॥ ऐसाकिर्तीतूंहिंडसी॥ तेतुजसांपडेलकेंसी॥ येका देवार्यांगुप्तअसेल॥ ८८॥ मेळविलाअसेलभ्रतार॥ येकादाउत्तमनृपवर॥ तेथेंतूह्मासि अनुसर॥ केंसेनीहांईल॥ ८९॥ आतांसांडितिचीभ्रांती॥ राहावेंआमच्यासांगाती॥ सुंदरमेळऊनियुवती॥ येरवादराजकन्या॥ ९०॥ ऐकोनिसुमंतदेतप्रत्युत्तर॥ राया परिसेशपताविचार॥ निजविरहितजितुकासुंदर॥ तेमातेसमानजाणणें॥ ९१॥ येरेंदा खविलेंहारासी॥ पाहूनिआनंदलोमानसीं॥ ह्मणेयेथेंभेटेलमालतीतुह्मासी॥ तरीं कायवोळखाल॥ ९२॥ येथेंनराहेंसर्वथा॥ आणिदुसरीनकरानिकांता॥ यावेहासीघडो भलतीअवस्था॥ परीहेंतबुद्धीनविच्यारी॥ ९३॥ परिसोनियाचादृढभाव॥ बोलताजा हाठातेनराव॥ हारान्नाकेंसाअसेलभाव॥ तोमजदाखविजे॥ ९४॥ राजाह्मणेतयाला॥ भ्रतारअसेपाहिला॥ सुमंतह्मणेमीपाहिला॥ हेंनघडेनिजपासूनि॥ ९५॥ जरीतंकारि-तीभ्रतार॥ तरीबापेंपाहिलोंनृपवर॥ त्याचाअंगिकार॥ मजवीणकायचाडहोती॥

॥९६॥ तिणंहें केला असला निर्धार॥ मजविरहित जितुका नर॥ तो बापसहोदर॥ मानि
ला असेल जाणपां॥९७॥ तिचा आग्रह जरी कं ठगत जाला॥ तरीं न सोडीं बोलिया बोला
॥ हा मज निश्चय कळला॥ पहिल्यापासोनी॥९८॥ ऐकोनि हांसती खदखदां॥ ह्मणे जी
बहुत भोगिल्या आपदा॥ आतां सुखें दोघें नांदा॥ मालती समवेत॥९९॥ ते असे आम
चे गृहासी॥ भेटी करी तुह्मासि तियेसी॥ मग उठोनि त्वरेसी॥ केला प्रवेश गृहामध्यें
॥१००॥ फेडूनि वस्त्रें पुरुषाचीं॥ परिधान केलीं पूर्वील स्त्रीपणाचीं॥ घोळिलीं होत्रीं
हळदीचीं॥ लेइली तोचि अळंकार॥ १॥ प्रेमाची पुतळी॥ आली सुमंताजवळी॥ मा
था ठेवी चरणकमळीं॥ तो जाहाला तटस्त॥ २॥ ती सबोले सुमंत॥ नृप गेला असेल गृहां
त॥ तो नाहीं तुज समवेत॥ हें तों अपूर्व असेपें॥ ३॥ मालती ह्मणे न करावें अनुमान॥ नृ
पतो चीमिचजाण॥ मग फिरूनि सकळ कथन॥ कथितां जहाली सर्वही॥ ४॥ तुमचें व्हा
वया दर्शन॥ अन्नछत्र निर्मिलें जाण॥ केलें ब्राह्मणां संतर्पण॥ व्रता सि गणती नाहीं॥
५॥ जें जों विपरीत घडलें होतें॥ तें तें अवघें विदीत केलें॥ ह्मणे जे णें तस्करें हरिलें॥ तो ही
येथें असे जी॥ ६॥ थोर केला सायास॥ मज कारणें घेतला वनवास॥ तो शांकरें घडविला
सोरस॥ पुनरपि दंडवत घातलें॥ ७॥ सुमंतें ह्दयीं आळंगिली॥ प्रेमें दोघांची आसुवें
टळलीं॥ त्या सुखाचीन व्हाळी॥ जाणती अनुभवी ये॥ ८॥ थोर उपमा त्या सुखाची॥ जे

सीरामआणिसीतेची ॥ कींरुद्रआणिगौरीची ॥ श्रमांतीभेटीजहाली ॥ ९ ॥ आणीकये
कदृष्टांत ॥ हरपलाकोणयेकाचाअर्थ ॥ तोसांपडेअकस्मात ॥ तैसेपरीत्यादोघांसी ॥ १०
॥ बहुतदिवसांचाक्षुधार्थी ॥ तयासिक्षीरसिंधुचीप्राप्ती ॥ तैसीएकमेकांचीस्थिती ॥ पर
स्परेंआनंदमय ॥ ११ ॥ सारिलीआंघोळीमार्जन ॥ उभयतांजालेंभोजन ॥ तंवरजनीप्र
काशमान ॥ मावळलादिनकर ॥ १२ ॥ उदयकेलादिनकरें ॥ मालतीनेंपरिधानकेलीव
स्त्रें ॥ सभामंडपींआदरें ॥ बोलाविलेंप्रधानांसी ॥ १३ ॥ चतुरआलेअष्टप्रधान ॥ मि
ळालेसकळिकजन ॥ सुमंतासीकरितीनमन ॥ महानुभावब्राह्मणनियां ॥ १४ ॥ राजा
म्हणेप्रधानासी ॥ एकासांगतोंतुम्हांसी ॥ तीननमासनंवआम्हासी ॥ करणेंअसे-
कार्यस्थिती ॥ १५ ॥ कार्यकरणेंअसेंनिगुर्ती ॥ तुम्हीचालवावीराज्यानिती ॥ अ
न्नछत्राचीगती ॥ तैसीचचालवणें ॥ १६ ॥ आम्हांचाअनुमाननधरावा ॥ कांहीं
वादस्वतांकरावा ॥ कांहींसंशयनधरावा ॥ मनामाजीमंत्रीहो ॥ १७ ॥ देऊनिवस्त्रें
अळंकार ॥ आज्ञादेततयानृपवर ॥ ते बहुहिंडलेतयांथोर ॥ हर्षबहुतवाटला
॥ १८ ॥ आजेविरहितकवणायेऊनयावें ॥ रात्रंदिवससावधअसावें ॥ म्योतेप्र
पातीहेंकायनिमित्तेंकरावें ॥ तैसांगातलेंपाहिजे ॥ १९ ॥ कवीम्हणेजीएकाव-
चन ॥ सुमंतदेहींजाहालाअतिक्षीण ॥ तोपुष्टव्हावयाकारणें ॥ आदरीलेंमा-

वि॰च
६
लनीनें॥ २०॥ धातुक्षीणजाह्याल्या असतां॥ उपच्यारकरीनिगुती॥ मदनाद
नाशनिशक्ती॥ अधिक होतसे॥ २१॥ आर्धांचसंदरआणिसगुण॥ वरीउप-
च्यारकेलागहन॥ तेणेंशोभलाजाणपूर्ण॥ पौर्णीमेचानिशापति॥ २२॥ आंगाची
दिसेदिव्यकांती॥ विशेषवाणठीस्थिती॥ मालतीसांगेव्युत्पत्ती॥ सकळराज्याची
॥२३॥ तीनमाससंपूर्णजाहाले॥ नगरअवघेंशृंगारिलें॥ बरवेमुहूर्तविच्यारीले
॥ सुमंतबेसविलासिंहासनीं॥ २४॥ ब्राह्मणकरितीवेदध्वनी॥ नमस्कारकेला
प्रधानजनीं॥ वाजंत्र्यांच्यालागल्याध्वनीं॥ दानमानसमस्तांदीधलें॥ २५॥ सु-
खीकेलेयाचकजन॥ केलेंब्राह्मणसंतर्पण॥ मालतीनेंसुलक्षण॥ चालविलेगृह
स्थिती॥ २६॥ राज्यचालविअतीनिगुती॥ म्हणेंतुमचीमाताकरीतसेलखती
॥ मालतीकरीनसेंविनंती॥ निचीवार्ताकेलीपाहिजे॥ २७॥ येणेंरितीविज्ञाप-
ना॥ माजिलिहिजे काशीश्वरासिजाणा॥ जेजेघडूनआलीविवंचना॥ तेतेअ
वघीलिहिलीपाहिजे॥ २८॥ मगतेमानलेंसुमंता॥ लिहिलीअवघीसमूळक
था॥ सकळक्षेमकुशाळता॥ अतिआदरेंकरूनियां॥ २९॥ सुमंतेंदूतांसकरू-
निहंकारा॥ म्हणेतुम्हींजावेंकांतीनगरा॥ पत्रदेवूनीकाशीश्वरा॥ आमचेंक्षेस
सांगिजे॥ ३०॥ दूतनिघालेत्वरित॥ पावलेनगरकांतींत॥ येतांदेखतीसमस्त

भेटलेरायासीपैं ॥ ३१ ॥ पत्रिकादिधलीकरीं ॥ नृपेंवाचिलीसविस्तरीं ॥ अतिआ
श्चर्यकरी ॥ मोहेंढळतीअश्रुपात ॥ ३२ ॥ बोलाऊनिबाह्मणीसं ॥ वार्तासांगेसुमंत
मालतीचीशब्दमतीसी ॥ श्रुतकेलेंराणियेसी ॥ तिहिआनंदेंहर्षली ॥ ३३ ॥ पत्रिका
वाचीयथार्थ ॥ सुमंताचेंहस्ताक्षरलिखित ॥ पाहूनियांआनंदभरित ॥ जाहालास
मस्तांसी ॥ ३४ ॥ बहुतआनंदसर्वांमानसीं ॥ नारीनगरग्रामवासी ॥ हर्षायमानस
र्वांसी ॥ अतिआनंदजाहालाअसें ॥ ३५ ॥ राजासांगेकारटिकरा ॥ प्रधानासीश्रुतक
रा ॥ नांदेंभरूनिशर्करा ॥ वांटिवीनगरांत ॥ ३६ ॥ थोरकेलामहोत्साह ॥ नशाणीपि
टिलाघाव ॥ सकळसैन्यासीराव ॥ निघालाभेटीसी ॥ ३७ ॥ चालिलेंचतुरंगसैन्य ॥
पालखिनवेंसर्वांलीबाह्मण ॥ सवेंराणीकुमरघेवून ॥ इष्टमित्रआमवर्ग ॥ ३८ ॥ नंव
ईकडेपुष्पावतीसी ॥ श्रुतजाहालेंसुमंतासी ॥ तोनिघालापरिवारेंसी ॥ वाजंत्रेंगजंत ३९
नगरश्रृंगारिलेंनगुर्ती ॥ गुढियानोरणेंशोभती ॥ नृत्यांगनानृत्यकरिती ॥ ठाईंठाईंआ
नंदा ॥ ४० ॥ सर्वश्रृंगारमंडित ॥ पालखीवैसेपालखांत ॥ भागरष्टभागींअसेजात ॥ सु
मंताचिया ॥ ४१ ॥ आलेनगराबाह्यप्रदेशीं ॥ भेटीजालीकाशीश्वरासी ॥ आणिमानेश
ब्दमतीसी ॥ नमस्कारीतांपैंजाहाला ॥ ४२ ॥ मालतीभेटलीमातापितयांसी ॥ नमस्कार
केलासासुवेसी ॥ मर्यादानाहींत्यासुरवासी ॥ आदरेंनगरींप्रवेशाले ॥ ४३ ॥ आलेराज

गृहासी॥ वैसकारजाइालासकळांसी॥ आरांगणेंकेळीअ॥तसीं॥ इष्टजनासमवेत॥ ४४॥ ऐसातो दिवसक्रमिला॥ दुसरादिवसउगवला॥ रायेंसमारंभकेला॥ लग्नलाविळें दोघांचें॥ ४५॥ मालतिआणिसुमंतासी॥ शेंसपाठमारिखदोघांसी॥ चोसंमा घाळीकुस शेसा॥ गौरविलेंब्राह्मणासी॥ ४६॥ यथाविधिकेलेंच्यारीदिवस॥ दानधर्मकेलाबहुवस॥ सकळपदार्थदीधलेत्यास॥ सुमंतासआदरें॥ ४७॥ मालतीनिरविलीब्राह्मणीसी॥ विनं तीकलीविशेषेसी॥ लिखितपत्रिकातुह्मासी॥ सांभाळीतजावें॥ ४८॥ निरोपपुसोनिनिघाला॥ सुमंतवोळवीतआला॥ अतिआदरेंपरतला॥ पुढेंचालिलाकाशीश्वर॥ ४९॥ सुमंतआ णिमालती॥ शब्दसर्वोमहासती॥ सुखेंराज्यकरिती॥ पुत्रपौत्रांजाणपें ५०॥ तेणेंचरी तीकाशीश्वर॥ चालवीआपलाराज्यभार॥ लिखितपत्रींसमाचार॥ परस्परेंघेताती॥ ५१॥ ऐसीकथामनोहर॥ साक्रूरविसांगेसविस्तर॥ रात्रक्रमिलीदोनप्रहर॥ पुढेंकायअ पूर्ववर्तलें॥ ५२॥ साक्रूरवीबैसेस्वस्थानीं॥ वेताळाचीनकळेकरणीं॥ मयूरांतप्रवेशूनी॥ सांगेलकथापवित्र॥ ५३॥ हरिदासाशिवदासाचेंकथन॥ श्रोतींकरावेंश्रवण॥ परिसती त्यांसिउदारत्वधैर्यपूर्ण॥ होईलसांगेहरिदास॥ ५४॥ ॥इतिश्रीविक्रमचरित्रकथा॥ हरिदासहोयसांगता॥ तेंऐकावेंश्रोतां॥ स्वस्तचित्तकरून॥ १५५॥ ॥इतिविक्रमचरित्रेअष्टमोऽध्यायः॥ ८॥ ॥ ५॥ ॥ ५॥ ॥

१२ ब श्रीगणेशायनमः॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ श्रीगुरुभ्योनमः॥ साकुंरवीगेलीआपुल्याठा अ
१ यां॥ वेताळप्रपूरींप्रवेशोनियां॥ उडोनिबैसलातयाठायों॥ चांरंगावरी॥ १॥ उपक्रमक- ९
शीनृपवर॥ तयासिउत्तरदेतमयूर॥ गृहस्वामिनीन्यानह्मतांअभयकर॥ तरींकथानसां-
गवे॥ २॥ पुनरपिहांसणेंबोलणेंपाध्यिनासी॥ मयूररखवावोदांभिंतीसी॥ कथापरिसाव्य
णेसयासी॥ परिसतांहोयविश्रांती॥ ३॥ रत्नपुरीमाझारी॥ राजारत्नमणिराज्यक
री॥ तयाचाप्रधानविचक्षणअवधारीं॥ पुत्रासीहलनांदती॥ ४॥ राजपुत्रशिवदास॥
प्रधानपुत्रहरिदास॥ यादोघांपडिलामैत्ररस॥ अतिप्रीतिकरूनी॥ ५॥ दोघेयेकमे-
कांविणवेगळे॥ क्षणयेकनव्हतीकवणेकाळें॥ जैसेमित्ररामलक्ष्मणवाहिले॥ तैसेदि
सतीउभयतां॥ ६॥ दोघेबैसतीयेकांतीं॥ दोघेआरोगणासारितीपंक्ती॥ दोघेजण-
मागन्वालती॥ निद्राकरणेंदोघेजणीं॥ ७॥ ऐसेंअसतांतयासी॥ रत्नमणीह्मणेपुत्रा
सी॥ तूंप्रधानपुत्रासवेंखेळसी॥ राज्यनीतिसांडोनियां॥ ८॥ तूंशाहाणाआणिप्रबु
द्ध॥ पाहातजावेंराज्यकृत्यवाद॥ सांगतसंप्रबोध॥ तोजिवींधरावा॥ ९॥ रायेंईतु
केंसिकाविलें॥ परितेणेंमनाहींधरिलें॥ क्षणभरिनाहींवेगळेंकेलें॥ प्रधानपुत्रासी
॥ १०॥ ऐसेंक्रमिलेकितिकादिवस॥ बहुतसांगतलेंपुत्रास॥ परितोनसोडीखेळास॥ १
मगराजाकायविचारी॥ ११॥ बोलावूनिप्रधानातें॥ ह्मणेतूंआपुल्यापुत्रातें॥ जरखेळ

तांदेखेनदोघांनें॥ तरतुजसिक्षाकरीन॥ १२॥ प्रधानह्मणेजीनृपवरा॥ आजिचेंमजक्षमाकरा॥ जरीखेळतांदेखालकुमारा॥ तरिमजदंडावें॥ १३॥ प्रधानआलामंदिरासी॥ बोलाउनआपुल्यापुत्रासी॥ सांगताजाह्मलातयासी॥ जैसजाहोताकोपला॥ १४॥ रायेंकेलीबहुतबाहरी॥ शिवदासाचासंगनकरी॥ जरीखेळसीतूंइतुकियावरी॥ तरीमजवरीबोलनाहीं॥ १५॥ हरिदासह्मणेजीताता॥ तुह्मीमजसांगितलेंह्मिना॥ जरित्यासींसंगकरीनआतां॥ तरीतुमचीआपलअसे॥ १६॥ ऐसाक्रमलादिवस॥ सूर्येंकेलाप्रकाश॥ सत्वरउठिलाशिवदास॥ बोलाऊंपाठवीप्रधानपुत्रास॥ १७॥ दूतेंतयासिबोलाविलें॥ येरेंनयेऊंह्मणितलें॥ विचक्षणेंविचारिलें॥ सजानयासिकोपेला॥ १८॥ दूतफिरोनियांआला॥ तेणेंवृत्तांतसांगीतला॥ रायेंदुसरादूतपाठविला॥ परितोमागुतानयेची॥ १९॥ पाठवीदूतामागेंदूत॥ तोंझिडकारोनिटाकित॥ मगविचारितांआठाराजसुत॥ आपणासिजाणेंलागेल॥ २०॥ आलाअसेलवडसवडी॥ ह्मणेतूंमाझाजिवाचागडी॥ आजिकांकेलीझाडाझाडी॥ माणसखयालं॥ २१॥ हरिदासेंवृत्तांतसांगितला॥ राजाप्रधानासिकोपला॥ आतांजरतुझासंगकेला॥ तरकोपेलप्रधानमज॥ २२॥ राजपुत्रह्मणेहरिदासासी॥ जरीतूंगडीसोडिसी॥ तरीमीत्यजिनप्राणांसी॥ ह्मणोनिसुरीकाढिली॥ २३॥ जंवहाणोंपाहेपोटीं॥ तंवहरिदासेधरि

ळीमुखी ॥ ह्मणे कटाकटा वोरवटी ॥ अविचारगती केली होती ॥ २४ ॥ त्यावरिला परमार्थ ॥ तुवां केला होता अनर्थ ॥ जिवें थोर जाला भयाभित ॥ ह्मणे देवें अरिष्ट चुकविलें ॥ २५ ॥ मग बैसले एकांतीं ॥ परस्परें विच्यारिती ॥ ह्मणे येथें असतां संगतीं ॥ राया सि विषाद वाटेल ॥ २६ ॥ दोघांसी संगती घडे ॥ आणि पुरुषार्थ थोर वाढे ॥ जेणें करोनि पुण्य जोडे ॥ ऐसा विच्यार रावा मंत्र ॥ २७ ॥ त्यावरी बोले सिवदास ॥ सत्वर करीं उपदेश ॥ कांहीं न धरावें संशयास ॥ विलंब चिया ॥ २८ ॥ मग ह्मणे शिवदास ह्मणे ॥ हें नगर त्यजूनि जाणें ॥ पृथ्वी पल्लादण करणें ॥ तीर्थें देखणें वसुंधरेचीं ॥ २९ ॥ हा वरा मंत्र विच्यारिलासी ॥ माझा भंतर्भाव बोलिलासी ॥ आणि परमार्थ विच्यारिसी ॥ मग काय करितें जाहालें ॥ ३० ॥ कांहीं घेतलें द्रव्यासी ॥ न पुसतां माय बापांसी ॥ दोघे निघाले तया पासीं ॥ पाहाती तीर्थें क्षेत्रें ॥ ३१ ॥ पाहिलें ह्मीपांतर ॥ ग्रामें पुरें पट्टणें अपार ॥ देखती तीर्थें मनोहर ॥ तेथें स्नान दान-करिती ॥ ३२ ॥ नगरी सारिली राजनिती ॥ तंव जाली माध्यान्ह यामीं ॥ मग सभा विसर्जिली ॥ राजा भवेशोरा उठी ॥ ३३ ॥ स्नान संध्या सारिली ॥ तंव ताटें विस्तारिलीं ॥ रायें आटवण केली ॥ शिवदास कुमाराची ॥ ३४ ॥ राजा ह्मणे बोलावा पुत्रासी ॥ उशीर जाला भोजनासी ॥ सेवक पाहाती शिवदासासी ॥ तंव तो कोठें न दिसे

३५॥ ह्मणतीप्रधानाचेघरीं॥ दोघे खेळतअसतीलसारी॥ नयातेंपाचारा झडकरी॥ रा
जारवेळंबलाअसे॥ ३६॥ दूतअसतेधांवत॥ प्रधानघरधांडोळित॥ तंवतयाप्रधान-
पुसत॥ हरिदासकोठेंअसे॥ ३७॥ दूतींजावोनियांसांगितलें॥ कोठेंनादिसेह्मणि
तलें॥ रायेंमनींविचारिलें॥ गेलेअसतीलवेल्हाळीसी॥ ३८॥ राजाप्रधानजोनि
ला॥ वेळभरीमार्गपाहिला॥ ह्मणतीकार्यविचारजाला॥ हीकगवीशोधना॥ ३९॥
राजाह्मणेप्रधानातें॥ कांहीं दिसेदुश्चिन्हातें॥ तोह्मणेनुह्मांसांगितलेंमातें॥ स्यानि
वेदिलेहरिदासा॥ ४०॥ तोराहिलाआपुल्याघरीं॥ शिवदासेंबोलाऊधाडिलेंवेळदो
नच्यारी॥ तोनजायतेअवसरीं॥ मगआलाशिवदास॥ ४१॥ त्यागोत्र्यासिरवूणावि
लें॥ मगदोघेएकांतबैसले॥ त्याउपरीकायजालें॥ तेंनकळेमजपें॥ ४२॥ मगन
रितीदुःखातें॥ ह्मणतीआह्मांवर्जिलेंत्यानें॥ सांडोनियांसर्वस्वरवानें॥ त्यांहीसवि
लाप्रवास॥ ४३॥ मगह्मणतीधांवाधांवा॥ बहुमार्गीशोधघ्यावा॥ पाठलागकरा-
वा॥ अश्वारूढहोऊनियां॥ ४४॥ मगधांविन्नलेबहुतजन॥ हिंडतिवनोउपवन॥ परिन
कळेतयाचेंअनुसंधान॥ कोणेंमार्गेलागलेंअसें॥ ४५॥ धांवणेंबहुतधांवलें॥ तेंपर
तोनिमाघारेंआलें॥ रायासितेणेंजाणविलें॥ कोठेंनादिसतीह्मणोनी॥ ४६॥ तया-
च्याशोकार्णवा॥ ग्रंथग्रंथवाटवाभा॥ ह्मणतीदेवासदाशिवा॥ कायऐसेंकेलेंपें॥ ४७

रायाशोककेलियाकायसिद्धी॥ जनसंबोखीनानाविधी॥ तुम्हीत्याविचारुणा
नबंधी॥ भेटीकाळींहोईल॥ ४८॥ ऐसेंबोलोनिवचन॥ एककारितसमाधान॥ म
गहृदकरोनियांमन॥ चाळवितीराजनीती॥ ४९॥ इतुकेंइकडेवर्तलें॥ तंवयांहीमा-
र्गींक्रमियकेलें॥ उत्तमसरोवरदेखिलें॥ पाहतीतंवतेथेंमहंतबैसला॥ ५०॥ नमस्कारक
रितीतयासी॥ तंवतोअसेध्यानस्थऋषी॥ द्वादशवरुषेंभरतीतयासी॥ जाणगाविक्र
मा॥ ५१॥ त्याणेंविसर्जिलेंध्यान॥ उघडूनपाहेलोचन॥ दोघेंघातलेंलोटांगण॥ महंतें
दिधलाआशीर्वाद॥ ५२॥ पुशिलेंअवघेंस्वकुशळ॥ प्रधानेंसांगितलेंसमूळ॥ येथेंच
तुर्मासकरूंनिर्मळ॥ ऋषिरायास्वामियां॥ ५३॥ मुनिह्मणेतयातें॥ सुखीराहावेंयेथें
॥ जेंकल्पितअसामनातें॥ तेंसिद्धिसपावेल॥ ५४॥ दोघेतेथेंराहिले॥ विद्याभ्यासक-
रूंलागले॥ चतुर्दशविद्यासिकले॥ आणिशास्त्रअभ्यास॥ ५५॥ तेथेंक्रमिलेच्या
रमास॥ विद्याभ्यासदोघांस॥ मगविनऊनतापसास॥ ह्मणतीआज्ञादेइजे॥ ५६॥
गुरुह्मणेतयातें॥ तुह्मींजावेंदक्षिणपंथें॥ मार्गक्रमीतांचौविसयोजनांतें॥ तेथेंदो
नमार्गअसती॥ ५७॥ सोडोनिडावीवाट॥ उजवीधरावीगानिकट॥ वाममार्गतरीदु
र्घट॥ बहुतअसेजाणपां॥ ५८॥ ऐसेंसांगोनितयासी॥ देताजाहालावज्रशस्त्रासी ३
॥ अग्निस्पर्शतांयासी॥ होईलअभिनव॥ ५९॥ तेंगुह्यअसोंद्यावेंजवळिके॥ कोण॥

सनसांगा वेंविवेकें ॥ स्पर्शकेलियापावकें ॥ पावेलराजामृत्युकतें ॥ ६० ॥ शरूंकरींघेवो
नी ॥ दोघेगेलेलोटांगणीं ॥ महंतेंअश्वासनदेवोनी ॥ प्रसाददिधला ॥ ६१ ॥ मगतेथू
नप्रयाणकेलें ॥ दक्षिणपंथातेंधरिलें ॥ मार्गक्रमितांतयेवेळे ॥ चोविसयोजनें ॥ ६२ ॥ ते
थेंक्षणेकउभेराहिले ॥ तंवप्रधानकायबोले ॥ ह्मणेचालगावाहिलें ॥ उजवेवाटेसी ॥
६३ ॥ शिवदासह्मणेडावेवाटेजावें ॥ कायअपूर्वतेंपाहावें ॥ मगफिरूनियांयावें ॥
याचमार्गींमिळावया ॥ ६४ ॥ नाइकेवचनप्रधानाचें ॥ चिंतनकेलेंश्रीगुरूचें ॥ ध्यानक
रूनश्रीहरिचें ॥ डावियवाटेनिघाले ॥ ६५ ॥ जातअसतांपुढेंपुढें ॥ तंवझाडेंदेखलीं
उदंडें ॥ वाटिन्नलोप्रचंडें ॥ गगनचुंबितपें ॥ ६६ ॥ निंबनिंबाडेपळस ॥ वडपिंपळफ
णस ॥ हिरडेब्याहाडेबहुवस ॥ लागलेआकाशीं ॥ ६७ ॥ रवैरमोहापिंपरी ॥ बोरीआ
मळीविस्तारी ॥ आंबेआणिखर्जूरी ॥ पुष्पफळेंमंडित ॥ ६८ ॥ टेंबुरणीरायआंवळी
॥ घोटिलीखैडीकरवंदीजाळी ॥ नाडमाडपोफळी ॥ केळीसरळशोभित ॥ ६९ ॥
जांबुळीआणिनारिकेळी ॥ राजआंवळीसीताफळी ॥ भोजगोधणीसदाफळी ॥ ल
वतांनिफळभारी ॥ ७० ॥ जाईजुईसेवती ॥ मोगरेपार्जनकमालती ॥ दवणामारवा
केकती ॥ उल्हावतीपरिमळें ॥ ७१ ॥ आकाशींलागलेंचंदन ॥ नेपाळीनगुंडीकरंजव
न ॥ कांकडेबेहेळेचित्रकजाणा ॥ सुरतरूआणिदेवदारु ॥ ७२ ॥ मांरवेलनागवेलीसि

रस॥ सेवगोसि दीबहुवस॥ रुइहिवरतरवरास॥ पुष्पींफळींशोभती॥ ७३॥ ऐसेंतेंम
हारण्य॥ वृक्षवाढलेअतिगहन॥ तेंकवणेंकरावेंवर्णन॥ अठराभारवनस्पती॥ ७४॥
माझीतरीकेव्हडीमति॥ जेवर्णावयावनस्पती॥ विज्ञापनाश्रोतयांप्रती॥ तुह्मींगह-
नार्थीजाणावें॥ ७५॥ जातअसतांझाडझाडांट॥ पुढेंआंधारदुर्घट॥ देखतीवृक्षाक
धींडेनिट॥ एकयेकावरीउतरडी॥ ७६॥ त्यावनांभीतरीं॥ पक्षीबोलतीनानापरी॥
श्वापदांचीगर्जनाथोरी॥ तेणेंघुमतसेडोंगर॥ ७७॥ लंघुनिआलेडोंगरकडवसा
॥ तोंबैसलाअसेंदेखतीराक्षसा॥ हरिदासह्मणेशिवदासा॥ पैलपाहालक्षूनियां
॥ ७८॥ द्वादशयोजनेंचौरस॥ डोंगरअसेउद्दस॥ तेथेंअसेतोराक्षस॥ महाबळी
मांसआहारी॥ ७९॥ उंचजैसापर्वत॥ बैसलामार्गलक्षित॥ तवदेखिलेंअकस्मा
त॥ यादोघांजणांसी॥ ८०॥ यांहींदेखिलेंतयासी॥ तेणेंहीलक्षिलेंयांसी॥ हांक-
दिधलीआक्रोशीं॥ तेणेंनगरदुमदुमिलें॥ ८१॥ उठूनिआलाधांवत॥ खाईनगिळी
नह्मणत॥ विक्राळदाढाजिव्हारुळत॥ मुखामाजिपैं॥ ८२॥ केलेंगुरुचेंचिंतन॥ शा
स्त्रघेवूनिजालेसावधान॥ मगबोलतीवचन॥ मार्गसोडीवहिलापैं॥ ८३॥ तोह्मणे
आपुलेपाईआलेती॥ जावयाचीखुंटलीगती॥ देवेंआहारनिर्मिलासजप्रती॥ आ
जिच्यादिवसकर्मेंलपैं॥ ८४॥ मुखपसरोनिधांविन्नला॥ रायेंखड्गेंहाणितला॥ उठू-

निमाघारागेला ॥ पुनरपि धांवे राक्षस ॥ ८५ ॥ लात हाणितली शिवदासासी ॥ येरू
तोडी खड्गेसी ॥ मार्गेला टळापरेसी ॥ संतोषला हरिदास ॥ ८६ ॥ हरिदास चिंती गुरू
चे चरण ॥ ह्मणे रक्षिता तूं धन्य धन्य ॥ तूं साक्षात् परब्रह्म जाण ॥ गुरुराया ॥ ८७ ॥ स्व
ड्ग जंव हाणूं पाहे ॥ तंव राक्षस निसटला लवलाहे ॥ मग आवेक्षोनियां बाहे ॥ धाविन्न
लावेगेसी ॥ ८८ ॥ प्रचंड उचलोनियां धोंडी ॥ शिवदासावरी सांडी ॥ राजा खड्ग वेगीं खं
डी ॥ पाडी धरणीसी ॥ ८९ ॥ राक्षस हाणी शिळा पर्वत ॥ शिवदास शत खंड करित ॥
ऐसें घोरांद्र तेथ ॥ युद्ध मांडलें ॥ ९० ॥ शिवदास शिळा शत खंड करी ॥ राक्षस उठे वेगव
गत्रीं ॥ ह्मणे हा केसा भंगेल तरी ॥ ह्मणूनि चिंता पडियेली ॥ ९१ ॥ करी गुरूचें चिंतन ॥
ह्रदई धरिलें नामस्मरण ॥ रामां करीं छेदन ॥ या राक्षसाचें ॥ ९२ ॥ ऐसो करितां स्तवन-
स्तुती ॥ तंव असरणी जाडी वदती ॥ याचिये ह्रद्याति ॥ असे अमृत कुंपिका ॥ ९३ ॥
शस्त्रें हाणोनियां वोटी ॥ त्याचें ह्रदय सलर फोडी ॥ मग न लगतां पळ घडी ॥ हा मृत्क पा
वेल ॥ ९४ ॥ शिवदास जिवीं संतोषला ॥ शस्त्र घाव ह्रदईं हाणितला ॥ राक्षस सत्राणें
लोटला ॥ तेणें पृथ्वी दणाणिली ॥ ९५ ॥ पुनरपि शस्त्र हाणें ॥ राक्षस लोटला बहुसत्राणें
॥ पद्मिनी ऐकोनियां ह्मणे ॥ काय अपूर्व गर्जतें ॥ ९६ ॥ आई का आजि अपूर्व वाणी ॥ राक्षसें
सिं हल द्वीपा पाहुनी ॥ आणिली हो नी पद्मिनी ॥ ती ठेवर भुवनीं ठेवली ॥ ९७ ॥ येव-

टाकायदणदणाट॥ कीजालाअसेगारिलोट॥ कींराक्षसाहूनिबळकट॥ तेणेंअसेल-
साधिला॥९८॥विवरांतूंनबाहेर॥ मुखकाढूनपाहेसुंदर॥तिसदेखेनृपवर॥ तेणेंवी
र्यपातजाहाला॥९९॥ राक्षसवधिलायेणें॥ हापडलाकवणेंगुणें॥ हरिदासचिंतीम
नें॥ हेंकायजाहालेंदेवा॥१००॥ राक्षसवधलियावरी॥ याचियाआयुष्याचीस्मरलीपु
री॥शिवदासहोतानिमित्यधारी॥पूर्वजन्मिचासमंधी॥१॥ म्हणेकटाकटावोरवटेंजा
कें॥ गुरुनेंह्मतेंवर्जिलें॥तयास्तवऐसेंघडलें॥गुरुआज्ञाभंगिली॥२॥थोरकरित
सेखेद॥स्मरेरामकृष्णागोविंद॥ माधवआणिमुकुंद॥ तुम्हीरक्षावेंशिवदासा॥
३॥ करिगुरुच्चेंस्मरण॥पल्लवेंघालीपवन॥ तेणेंमूर्च्छनाजालीहरण॥ नेत्रउघ
डिलेपैं॥४॥ वेगींउठिगाबंधुराजा॥ रत्नमणिच्याआत्मजा॥सांगजीवींचियागुज
तेंमी॥सिद्धीपाववीन॥५॥शिवदासह्मणेगाबंधु॥ राक्षसाचाकेलावधु॥पैलतें
थेंदेखिलीवधु॥अतिलावण्यसुंदर॥६॥ तिचेंदेखूनिस्वरूप॥ मजजाहाला
विरहताप॥ जरिंशोधिलेंसप्तद्वीप॥नदेखेंलावण्यऐसें॥७॥ शीघ्रचालगातेथें
॥तुवांअवलोकिलेंअसेलजेथें॥पूर्णकरूंकामनेतें॥ ऊठचालझडकरी॥८॥दोघे
वेगवगत्रउठिले॥झडकरविवरद्वारापातले॥ भीतरीअवलोकितेजाले॥तंवमू-
च्छिंतदेखिलीपद्मिनी॥९॥पाहूनितिचाअवसर॥शिवदासापुनरपिउठिलाज्व

र॥ प्रधानह्मणेगाधरिधीर॥ ईससावधकरितोंमी॥ १०॥ नेत्रींलावूनिजीवन॥ शी
तळघातलापवन॥ पद्मिनीउघडीलोचन॥ टकमकांलक्षितसे॥ ११॥ पुनरपिघातला
वारा॥ सावधजालीतेसुंदरा॥ मगप्रधानपुसेविचारा॥ येथेंकेवीवास्तव्य॥ १२॥ मगत्या
णेपद्मिनी॥ मजवस्तीसिंहलद्वीपपट्टणीं॥ आणिलेंराक्षसेंहरूनी॥ आनानिगुतीजा
णपां॥ १३॥ नाहींसंसर्गसमागम॥ अन्नउदकाचाअसेनेम॥ ऐसाकंठीतकाळक्रम॥
लोटलेबहुतादिवस॥ १४॥ आजिवर्तलेंविपरीत॥ त्याहोउविलाअद्भुत॥ ह्मणूनिपा
हातहोतेंभ्रांतभीत॥ तंवराक्षसाटसाळरवंडलें॥ १५॥ तोहोताअतुर्बळी॥ तुह्मीं
आलेतीमहाबळी॥ हेंम्यांदेखूनन्हाळी॥ माझेंमनआनंदलें॥ १६॥ ऐसाधरा-
वावर॥ हामनीचानिर्धार॥ नधरवेजिवींधर॥ तेणेंमूर्च्छितपडियेलें॥ १७॥ रा
याचेंजेंमानिचें॥ तेंचमनपद्मिनीचें॥ आनंदलेंमनउभयांचें॥ मगप्रवेशतीवि
वरांत॥ १८॥ हरिदासाचीऐकाव्युत्पत्ती॥ केलीलग्नाचीआयती॥ गंधर्वलग्न
लाविलेंनिगुती॥ दोघांभरीसेशापाट॥ १९॥ आमोल्यमुक्ताफळांचामाळा॥ प-
द्मिनीघालीशिवदासाचियागळां॥ तोसुरवाचासोहाळा॥ जाणतीअनुभवि
ये॥ २०॥ ऐसीजालीलग्नामरी॥ प्रधानेंकेलामंत्रविधि॥ जेंजेंकर्मपदोपदीं॥
तेतेंकरीहरिदास॥ २१॥ जालेंसेहोमहवन॥ मगकरितीभोजन॥ प्रक्षाळूनकरव

दन ॥ विडेघेतीकर्पुरेसी ॥ २२ ॥ धूपाविलाउत्तमवावरी ॥ पद्मिनीतेथेंसेजकरी ॥ दुसरापलंगमध्यमंदिरीं ॥ निद्राकरावयाप्रधानासी ॥ २३ ॥ दोहींठाईंक्रम नें ॥ बुकाकस्तूरीउधळणें ॥ कर्पूरजवादिकचंदन ॥ पासोडापटकुळाचा ॥ २४ ॥ निद्राकरीप्रधानकुमर ॥ शिवदासप्रवेशेनिजमंदिर ॥ पद्मिनीनेंकेलाशृंगार ॥ उभीराहेहरिदासाजवळी ॥ २५ ॥ तयासिदेधलाकर्पूरविडा ॥ तोह्मणेबाईतुह्मीजावेंकडा ॥ रात्रजालीअसेवाडा ॥ माध्यान्हीनक्षत्रआलेंपें ॥ २६ ॥ मगतेऐकूनिसुंदरी ॥ गेलीनिजगृहाभीतरी ॥ सेवाजाणवीनानापरी ॥ प्राणनाथालागोनी ॥ २७ ॥ करितीनानाभोग ॥ भोगीजाणतीतोरंग ॥ रंगीरंगलाबहुतरंग ॥ चुंबनदेतीएकमेकां ॥ २८ ॥ ऐसीक्रमिलीतेनिशी ॥ उदयजालाभास्करासी ॥ दोघेभेटलेंयेकमेकांसी ॥ अतिआदरेंकरुनियां ॥ २९ ॥ दोघेभेटलेंयेकवट ॥ प्रधानह्मणेचलाजाऊंउजवीवाट ॥ गुरुनेंसांगितलेंअसेप्रगट ॥ निघतेसमई ॥ ३० ॥ हरिदासह्मणेशिवदासा ॥ कष्टजालेंअसतीबहुतस ॥ येथेंक्रमूं साच्यारमास ॥ मगजाऊंतयाठाया ॥ ३१ ॥ प्रधानाविचारीमानसीं ॥ हावरपडजालाविषयसुखासी ॥ नसोडवेबाईलेसी ॥ ह्मणेमोहेंगोविलेंअसे ॥ ३२ ॥ प्रधानह्मणेरायासी ॥ मीजाईनउजव्यापंथासी ॥ येथेंक्रमूनचातुर्मासासी ॥ साधु

नायेथेंयेईन॥ ३३॥राजाम्हणेतयासी॥ तूंलवत्याठांयांजासी॥ स्त्रस्वसांगरींगुंतसी॥माझीनव्हेआठवण॥ ३४॥ तूंजरीनयेसी माघुता॥ तरीमीप्राणदेईनतत्वतां॥ ऐसेंपरिसोनियथार्था॥ भाषआतांमजदेई॥ ३५॥च्यारिमासांदिवससान॥मीयेईनजाणनिरूत॥ हीमाझीभाकसत्य॥ यासिअन्यविच्यारनाही॥३६॥भाषदेवूनिनिघाला॥शिवदासपाषिर्नासाहसराहिला॥ मगकेंसाप्रसंगघडला॥ तोसांगरेहरिदासा॥३७॥ ॥इतिश्रीविक्रमचरित्रकथा॥ हरिदासह्मोयसांगता॥ तेऐकावीश्रोतां॥स्वस्थचित्तेंकरोनियां॥१३८॥ ॥इतिश्रीविक्रमचरित्रकथननाम नवमोऽध्यायः॥९॥ ॥अध्याय॥९॥

श्रीगणेशायनमः॥ श्रीसरस्वत्यैनमः॥ श्रीगुरुभ्योनमः॥ हरिदासविवरांतूनिनि
घाला॥ आलियामार्गीन्वाटिला॥ लागवेगेंसीआला॥ जेथंवाटादोनफांकल्या १॥ लागला
उजव्येमार्गीं॥ जातअसेमनोवेगीं॥ हरिनामेंसत्संगीं॥ पंथंक्रमितजातअसे॥२॥ बत्ति
सयोजनेंमार्गक्रमिला॥ पुढेंउत्तमसरोवरदेखिला॥ तेथेंमहंतअसेबैसला॥ तयासकेले
दंडवत॥३॥ मुनीआशीर्वाददेत॥ पुसेक्षेमवृत्तांत॥ येरूमूळारंभसांगत॥ जेंजेंवर्तलेंहोतें
४॥ परिसोनियांपूर्वभाव॥ ह्मणेयाचेहृदईअसेदृढाव॥ करितांजाहालाअनुग्रह॥ करम
स्तकींठेविला॥५॥ हरिदासकरीस्तवन॥ मुनीसांगेविद्यापठण॥ विवरिचेंराहिलेंकथन
॥ तेंअपूर्वपरिसावें॥ ६॥ विषशींशाषदासआणिपद्मिनी॥ नांदतीआनंदेंकरोनी॥ आ
ज्ञारक्षितानाहींकोणी॥ दोघांवाचूनितिसरा॥७॥ द्रव्यासनाहींगणित॥ लेणीलुगडी·
अपरमित॥ तेलघृतधान्यबहुत॥ होतेंराक्षसेंसांठविलें॥८॥ पद्मिनीनिपजवीअंनचो
खट॥ दोघेंजेवितीएकवट॥ आणिखेळतीसारिपाट॥ ऐसाकाळक्रमितीहो॥९॥ बहु
तांदिवसक्रमलियावरी॥ एकेदिवसीखेळतानासारी॥ प्रीतिवादेंपद्मिनीच्याहृदयावरी
रायेंहातठाकिला॥१०॥ करपडिलाअतिचाणें॥ पदकतुटलेंभारेंतेणें॥ अहापद्मिनीह्मणों
तोंतोंनिसटलेंहातिचें॥११॥ बैसलीहोतीनदीच्याकांठीं॥ तेंअक्षोभतळतळवटीं॥ मीनेंफ
रतांघरटीं॥ मासाह्मणूनिगिळियेलें॥१२॥ कटाकटाकरीपद्मिनी॥ तेणेंराक्षसेंआणिलें

कोढूनी॥मजादिधलेंह्मेतेंआणूनि॥ऐसेंप्रभुमंडळिनमिळेपैं॥१३॥पद्मिनीपरमरूदनक
री॥शिवदाससंबोखीनानापरी॥कोणकोणत्याचीनवलपरी॥ऐसीबहुतमेळवीन॥१४॥मे
ल्यापाठींकायमरणें॥गेल्यापाठींवृथाधांवणें॥समुद्रींबुडाल्याशोधणें॥हाविवेकजाणसुंद
री॥१५॥जंववरीजयाचाभोग॥तंववरीघडेतयाचासंग॥त्यापरीसमेळावनस्वांग॥खेद
नधरीवल्लभे॥१६॥ ॥श्लोक॥ ॥स्वदन्नगच्छामिहसन्नजल्पंगतंनशोचामिकृतन्नमन्ये
॥द्वाभ्यांतृतीयोनभवामिराजन्किंकारणंभोजभवामिमूर्खः॥१॥टीका॥जोंखानजातो-
खयें॥आपणबोलूनहास्यकरूंनये॥हेंगोष्टियासिमोकलिधाय॥हेंतोंमूर्खजाणावें॥१७
दोघेंगोष्टीकरितां॥तिसराजायनाविचारितां॥त्यानावमूर्खसर्वथा॥तोजाणावागेसुंद
री॥१८॥शिवदासेंकेलेंसंबोखन॥राहिलीहटकरूनीमन॥पदकघेऊनीगेलामीन॥अ
स्तोमडोहामीनदी॥१९॥शिवदासआणिपद्मिनी॥आनंदेंअसतांनिजघरभुवनीं॥स्वइ-
च्छाभोगभूषणीं॥जेजेसमयींआवडेजें॥२०॥ऐसेंतेथेंनांदतां॥कैसीपडलीअवस्था
॥तेपरिसावीअपूर्ववार्ता॥येकचित्तेंकरूनियां॥२१॥देशींपडलेंअवर्षण॥तेणेंआटलें
नदीचेंजीवन॥मीनमगरगेलेपळून॥जेथेंजळअक्षोभअसे॥२२॥विवरींहानिउत्तर
दिशो॥सेताळीसयोजननगरसे॥सप्तयोजनरुंदीअसे॥तयानामहेमपुरी॥२३॥रा
ज्यकरीकनकमेरु॥तेथेंअवर्षणपडीलेंथोरु॥वापीकुपींनाहींनिर॥तटाकनदीआटलेचा

२४॥नगरजनउदकाकारणें॥सोविठीं असतीउदकस्थानें॥जेथेंअसतांअखोभजीवनें॥ते
थेंतेंयेयाइठे॥२५॥नगरिंचाटिवरयेक॥ तोमीनाकारणेंपाहेउदक॥हिंडताहिंडत दाग॥वि
वरद्वारदेखिलें॥२६॥आडाअसेदुरीबहुत॥डोहोदेखिलाअकस्मात॥जळउसाळेंह्मण
त॥वाशुचेनिछंदें॥२७॥तेथेंजाळेंटाकिलें॥मछबहुतसांपडले॥तेकावडींतघातले॥पाली
जाळेंपुनरपि॥२८॥जयानेंपदकह्मोतेंगाळिलें॥तोमासासांपडलातयेवेळें॥टिवरांचेंमन
आनंदलें॥कांतिबरवीतयाची॥२९॥ पदकाचेनिसंसर्गदोषें॥मीनसुवर्णकांतीदिसे॥
आणिसीपडलेबहुतमासे॥तेणेंभरिलीकावडी॥३०॥स्कंधींवाहोनिनिघाला॥आपु
ल्यानगरापावला॥ग्रहप्रवेशकेला॥मगसोडिलीकावडी॥३१॥दोहोंचोहोंदिवसांच
उपवासी॥आजिमिळालोंअन्नापाणियांसी॥पाककरावावेगेंसी॥ह्मणोनितोमछादिध
ला॥३२॥टिवरिसीह्मणतोटिवरु॥मीजातोंमछाविकराकरुं॥ह्मणोनिनिघालासत्वरु॥
तोबाजारींजातसे॥३३॥घरींटिवरीकायकरी॥ करकमळींघेवूनिछुरी॥मछाचेंउदर
चिरी॥ तंवउजेडपाडियेला॥३४॥पदकदेखूनिरत्नखचित॥थोरजालीसेविस्मित॥न
सुपेझांकिलेंत्वरित॥ कोणहीदेखेलह्मणोनि॥३५॥ तंवआलाटिवर॥त्यासिसांगितला
समाचार॥जिवींआनंदलाथोर॥ह्मणेंगुप्तकरूनिठेवावें॥३६॥टिवरीह्मणेंतयासी॥हेंयो २
ग्यनव्हेआपणासी॥वृथाठेवावेंभूमीसी॥याचिकोणश्लाघ्यता॥३७॥राजाकांहीद्रव्यदेईल

आमचायोगक्षेमचालेल॥ ऐसेऐकूनतिचेबोल॥ ह्मणेबराविचारसांगितला॥३८॥ मजअ
सेयेकइछित॥ पदकन्यावेंरायासीउचित॥ आजिवरीठेविलेंहोतेंगुप्त॥ वडिलांचाठेवाह्म
णूनि॥३९॥ पदकघालोनितबकांत॥ वरिझांकणघालित॥ रायासिजाणविलीमात॥ ह्मार
पाळेंतेधवां॥४०॥ रायेंभीतरींबोलाविलें॥ ठेवरेंपदकपुढेंठेविलें॥ ह्मणेवडिलींहोतेंघड
विलें॥ बहुतकाळाचेंअसे॥४१॥ आमचेंदैवउणें॥ उदरालागिंविकिलींभूषणें॥ इतुकेंठेवि
लेंहोतेंठेवणें॥ तेंतुजसमर्पिलेंराया॥४२॥ रायेंघेतलेंकरीं॥ बोलाविलेंजोहारी॥ काढिक
रींसत्वरी॥ बोलाऊनिआणिले॥४३॥ परिक्षाकरापदकाची॥ भूषणेंकवणेस्त्रियेची॥
निगुतिकरूनियाची॥ मजमतिसांगावें॥४४॥ जोहारींपाहिलेंलक्षून॥ ह्मणेहेंपद्मिनी-
स्त्रियेचेंभूषण॥ नकरवेयाचेंप्रमाण॥ हेंअमोल्यजाणाराया॥४५॥ भांडारग्रहींरत्नठेविलें
दिवशासिबहुतद्रव्यादिधलें॥ वस्त्रेंआभरणेंगौरविलें॥ तोहीगेलागृहासी॥४६॥ मगप्र
धानासीबोलाउनी॥ राजमंत्रसांगेकांनीं॥ स्त्रीमेळवावीपद्मिनी॥ शोधभूमंडळींक
रावा॥४७॥ मगआज्ञाघेउनिनिघाला॥ जंबुद्वीपधुंडाळिला॥ ग्रामपुरेंहिंडला॥ परी
नदेखेपद्मिनी॥४८॥ प्रधानफिरोनआलानगरा॥ सविस्तरविदितकेलेंनृपवरा॥ ह्मणेअ
वघींहिंडलोंवसुंधरा॥ परिदृष्टिनादिसेपद्मिनी॥४९॥ रायासिपडलीथोरचिंता॥ अंनउद-
काचीनकरीवार्ता॥ नलगेराजनीतिचिंता॥ जेवींअवस्थापद्मिनीची॥५०॥ नगरअवघेंदु

श्चित ॥ स्वधर्मी न लागे चित्त ॥ रायें आदरिला अपघात ॥ पुढें कैसें होईल ॥ ५१ ॥ रायाचे स्व
यंपाक भुवनीं ॥ शामाई नामें रांधावणी ॥ तिणें मात ऐकूनि कानीं ॥ धांवत आली राया जव
ळी ॥ ५२ ॥ राया कां चिंतावला असशी ॥ काय कल्पना असे मानसीं ॥ तें सांगावें मज पाशीं ॥ ते-
मिसि रूपावचीन ॥ ५३ ॥ रांधावणी ह्मणे राया उठी ॥ याची स्वल्प असे गोष्टी ॥ येवढी कां सप
आटाआटी ॥ करीं आतां आरोगणा ॥ ५५ ॥ मज सारिखी रांधावणी ॥ असतां तुज काय चिंता
मनीं ॥ जोडा मिळवीन जनीं ॥ पाहें कौतुक पैं माझें ॥ ५६ ॥ मी बोलत से त्रिवाचा ॥ सांडी का-
ळिमा जिवींची ॥ सांग वार्ता पदकाची ॥ तुज हें कोणें दिधलें ॥ ५७ ॥ राजा ह्मणे टिवरें दिधलें
ये रनें तया पाचारिलें ॥ एकांति पुसों आदरिलें ॥ शामाई आवानें ॥ ५८ ॥ ह्मणे त्वां दिधलें नृ
पातें ॥ तें मीन मागें मागुतें ॥ पदक जोडलें कवणें पदार्थें ॥ तें मज श्रवण करवावें ॥ ५९ ॥ सां
डून भयाची काळणी ॥ यथार्थ वदावी वाणी ॥ द्रव्य देईन निर्धारुनी ॥ दुसरें जाण पांडुरंग ॥
६० ॥ टिवर ह्मणे रांधावणीसी ॥ मासे धरावया गेलों नदीसी ॥ येक गृह ठेविला पोटासी ॥ त्या
चे उदरीं निघालें ॥ ६१ ॥ इतुकि मात ऐकिली ॥ मग ते निवांत राहिली ॥ ह्मणे बरवी बुद्धी -
सांगीतली ॥ कार्य साधोन भर वसा ॥ ६२ ॥ मग रायासि पुसिलें ॥ टिवरासि सवें घेतलें ॥ -
द्वारवती नदी तटाक वहिलें ॥ कोणे डोहीं हंसा पडला ॥ ६३ ॥ भूमीस चाले झडझडा ॥ मार्ग
क्रमी अति गाढा ॥ दरेदर कुटें उदंडा ॥ उल्लंघिली पैं देखा ॥ ६४ ॥ वीस योजन मार्ग क्रमिला

॥तंवमत्वंडडोहोदेखिला॥ ह्मणेयथेंमासागवसला॥मजलागींजाळ्यांत॥६५॥टिवरावूं
नगरींजाईं॥मीनदीमुळाचीकरीनसोई॥जंववरीकार्यसिद्धिहोई॥तंववरीशोधकरीन॥
६६॥मत्स्याहारीमार्गेंपरतला॥तोआपुल्यानगरापातला॥विधवनेंमागलाविला॥वनेंउपव
नेंक्रमिलीं॥६७॥पाहातपाहातनिघाली॥वनेंउपवनेंक्रमिलीं॥तंवविवरद्वारपावली
॥नदीचेतटींसंनिध॥६८॥भीतरीजंवप्रवेशली॥तंवपद्मिनीहोतीबैसली॥शिवदासा
नेंनिद्राकेली॥मगकायकरीते॥६९॥हस्तेंकरूनीखुणाविलें॥तिसआपणाजवळीबो
लाविलें॥ह्मणेमीअसेंअनाथयेकलें॥तुझेंदासत्वकरीन॥७०॥मजनाहींपोशितापा-
ळिता॥नसेसुतसखाभ्राता॥गणगोतवंशासर्वथा॥मजकोणीनसेपैं॥७१॥ऐसीनाना
वचनीं॥मोहिलीसेतेपद्मिनी॥नकळेरांडेचीकरणी॥भोळीतेमृगनयना॥७२॥ह्मणेनिद्रा
भूतअसेपति॥तोआतांहोईलजागृति॥पुसूनिउत्तरतयाप्रती॥मगतुझाअंगिकारकरीन॥
७३॥उठूनिभ्रातराजवळीआली॥मंचकावरीबैसली॥तंवत्याचीनिद्राहरिली॥दिधलेंउद
कआणुनी॥७४॥केलेंचरणक्षालन॥मगकरूनआचमन॥विडाघेऊनिपाहेदर्पण॥स्वरू
पआपलेंतेधवां॥७५॥हांसोनिबोलेपद्मिनी॥कोमळमृदुनम्रवचनीं॥घरचारकरितांमज
लागोनि॥सेवेसअंतरपडतसे॥७६॥तरीरांधावयाठेवीनयेक॥जेगृहकृत्यकरीलसकळिक
मीतुमचेसेवेकारणेंनिःशंक॥रात्रीदिवससावध॥७७॥ह्मणेदोघांततिसरेंठेवणें॥हेंअनु

भि॰च चितकर्मजाणे॥कोणजाणेकोणाचेंअंतःकर्ण॥दुष्टसुष्टनकळती॥७८॥मनुष्यामनुष्याअं ७
४ तर॥येकएकापरिसक्रूर॥तुवांनकरावाअंगिकार॥येकादेंविभ्रमरचिल।७९॥बहुतापरिसिक १०
विलें॥परितेंअल्पबुद्धिनाइकेवहिलें॥मगतियेनेंराह्मविलें॥पतिसंबोखोनियां॥८०॥रांड
राहिलीसेघरीं॥दळाकांडसंमार्जनकरी॥अन्नेंनिपजवीपरोपरि॥ऐसामासयेकभरला॥
८१॥पद्मिनीसवाटलेंहित॥विश्वासिकबहूत॥अंतरींचेंगुह्यगुजसमस्त॥संगेपुसेतिये
सी॥८२॥रांधावणीकरीकपट॥पद्मिनीसीअन्नवाढीचांखट॥आणिर्मा भिश्रिताविषदुर्घट॥
तेंवाढीसिवदासासी॥८३॥राजाजेवीषड्रस॥अंचवोनिकरीशास्त्रासिस्पर्श॥तेणेंनबा
धेत्यासिविष॥ऐसेंदिवसदोनचारिक्रमिले॥८४॥रांधावणीविचारीमानसीं॥अगाणिताबि
षघातलेंयासी॥नरिहानपवेमृत्यसी॥आतांकैसेंकरावें॥८५॥थोरपडिलासंदेहो॥ह्मणे
कोणकरावाउपावो॥पुसोंआतांआयुर्दावो॥कोणेंगुणेंमृत्यअसे॥८६॥मगकोणेयेकेदि
वसीं॥येकांतबैसोनपद्मिनीसी॥ह्मणेतुजआणिपतिसी॥प्रीतिकैसीपैंआहे॥८७॥येरी
ह्मणेप्रीतिकैसीमोठी॥सांगतसेजीविंचीगोष्टी॥लाहानअथवामोठी॥संशयपोटींनध
रीच॥८८॥रांडह्मणेअवघेंअसत्य॥पुरुषनसांगेजीवींचायथार्थ॥माविकतुजमातनिश्चि
त॥सांगतअसेल॥८९॥पद्मिनीह्मणेआईकआउ॥तयासिनाहींकपटभावु॥कायपुसों ४
नेसांगनिर्धारु॥जाणवीमजप्रती॥९०॥रांधावणीह्मणेऐकवचन॥त्यासपुसावेंस्वआ-

त्यमरण॥ जरी हें सांगेल सत्यरखुण॥ तरी प्रीति ऐसी जाणावी॥ ९१॥ पहा तो मग चित्तीं बेडी॥
ह्मणे याचि काय गोष्टी थोडी॥ नाहीं देणें घेणें याचि सांकडी॥ तो मज आतां सांगेल॥ ९२
तो भावकला दिनमणी॥ दोघे पहुडले एके स्थानीं॥ नाठाव रोनयां पद्मिनी॥ पुसती जा
ली प्राणेश्वरा॥ ९३॥ ह्मणे जी एक पुसतें मी॥ तें मी तिनें सांगा स्वामी॥ तुह्मी राजे सधर्
मीं॥ मज ठाउकें असावें॥ ९४॥ सांगावें आपुलें मरण॥ कदाचित् असावें श्रवण॥ परिस
नति त्वें वचन॥ काय बोले शिवदास॥ ९५॥ ह्मणे तां पुसिलें नेणतां॥ सांगतां मृत्युपाव
न आतां॥ आजि पासूनि हे वार्ता॥ न करावी जाणपां॥ ९६॥ मग राहिली ते निवांत॥ नव
उदय जाला आदित्य॥ रंभावणी तीसि पुसत॥ अति आदरें करूनी॥ ९७॥ यरी ह्मणे म्यां
पुसिलें॥ तेणें सांगून ये ह्मणितलें॥ सांगतां तात्काळ पावेन मृत्यु तें॥ ९८॥ रंभावणी च
डवा तियेसी॥ कैसी प्रीति ह्मणवित होतीसी॥ पुरुष तव दाकापट्यमानसी॥ जावी चिंगु
जन सांगे॥ ९९॥ केवढा घात ला संशय॥ थोर दारवविलें मरण भय॥ ऐसा के साप्रीति भ-
नूवय॥ स्त्री पुरुषांचा॥ १००॥ मी पूर्वीच सांगीतलें चिन्ह योग॥ तूं का रुसी जावा परिस चांग
त्याणें दारववला आपुला रंग॥ खोटेपणाचा॥ १॥ ऐसा नाना विधा दवोलिला॥ तिसी अह
ना उपजली॥ मग भिरें घालूनि कपाळीं॥ निद्रा कारती होय॥ २॥ न घे यां अन्न उदकातें॥
इच्छा न व्हे तांबूलातें॥ त्यजिलें अळंकार भूषणातें॥ न करी संभाषण पतिसीं॥ ३॥ ऐसी दे

स्तूनी।।कवणेपरी।। सजाबुजावीनानापरी।। कीं नजन्मीससुंदरी।। तेंमजप्रतीसांगावें।।
४।।सुखचंद्रकोमेळाअसे।। वदनींतांबूलनादिसे।। कुरळकेशविभत्स।। आनाकिंकार
दिसती।।५।।नकरसीगुह्यगोष्टी।। भंवयासिघालसीमिठी।। ह्मरयेकावळीनाहींकं
ठीं।। कोण्पगतीवल्लभे।।६।। कायइच्छामानसीं।। तेंसांगमजपासीं।। किंवाकोणहीदुरा
विलसी।। त्यासिकरीनमीघात।। ७।। नचुकेहोणारगती।। त्यांसितेंशाबुद्धिआठव
ती।।जैंजैंलिहिलेंपूर्वस्थिती।। तेंतेंकाळीं भोगावें।।८।। कायकारतेपद्मिनी।। नकळेपू
र्वदत्ताचीकरणी।। शुभाशुभकर्मानुसारणी।। तैसीचपावेउदयातें।।९।। पद्मिनीह्मणेजीप्र
णपती।। तुजमजअतिप्रीत।। म्यापुसिलीमृत्युचीगती।। तेकांमजनसांगाया।।१०।।
जरींसांगालउमरण।। तरींजीवाहोइलसमाधान।। नाहींतरीदेईनप्राण।। ह्मनिर्धारजा-
णावा।।११।।शिवदासह्मणेबोकांते।।मजसांगीतलेंश्रीगुरुनाथें।।श्रुतकरूनथतिसारियावें
नरींत्वांनसांगावेंकोणासीं।।१२।।ऐकेंमाझियाशरीरासी।।संगहोतांचिवन्हिस्त्री।।तरींपावे
नमृत्युसी।। हेंयथार्थजाणावें।।१३।। तयाचेंवचनपरिसोनी।। थोरउल्हासेपद्मिनी।।प-
द्मिनीमगउठलीझडकरोनी।। आरोगणेंसारिली।।१४।। केलासर्वशृंगार।। विडाघेत
लासर्वसाहितकर्पूर।।आपणआणिभ्रतार।।करितीक्रीडारत्नी।।१५।।ऐसातोदिवस ५.
क्रमला।।प्रभातेसूर्यउदयजाला।।हांसतहांसततेवेल्हाळा।।आलीरांधावयाजव

ळी ॥ १६ ॥ विधवा म्हणे पद्मिनीस ॥ आज शोभा आली कर स्वास ॥ कवणें पावली सहवास ॥ ते सांगावें वो माये ॥ १७ ॥ आयुष्य गोष्टि निर्मिता ॥ म्यां पुसिलें प्राणनाथा ॥ त्यांहीं सांगितलें यथार्थ ॥ ते परियेसी अपूर्व ॥ १८ ॥ अग्नि आणि रखडूासी ॥ भेद होतां दोहींसीं ॥ न लागतां पळमात्रासी ॥ मृत्य होईल ॥ १९ ॥ ऐकुनि पद्मिनीचें वचन ॥ थोर संतोष ली रांधावण ॥ म्हणे दोघांसी प्रीति लक्षण ॥ ऐसें मज गमलें की ॥ २० ॥ ऐसें संसारीं जाईजे दोघांचें येक चित्त होइजे ॥ या नावें प्रीतिलक्षण बोलिजे ॥ जगामाजि पैं ॥ २१ ॥ यानंतर रांधावणी ॥ पद्मिनीस बैसवूनि घालीवेणी ॥ दृष्ट स्नेह करें न्हुरोनी ॥ संतोष थवी जाहली ॥ २२ ॥ क्रमिले दोन च्यारी दिवस ॥ मार्गशीर्ष येकादशीस ॥ म्हणे मज दाखवीं शस्त्रास ॥ पूजा अर्चन करीन मी ॥ २३ ॥ नकळे रांडेचें मायासूत्र ॥ पद्मिनी आणून देत शस्त्र ॥ पूजूनि घाली दंडवत पवित्र ॥ म्हणे आजिचा दिवस असों दे ॥ २४ ॥ एकादशी कामिळीया वरी ॥ द्वादशीस पारणें करी ॥ इकडे दोघें सुखें जेवरी ॥ कारितां निद्रा ॥ २५ ॥ स्त्रवंपाकगृहांत ॥ अग्नि होता जळत ॥ शस्त्र घातलें त्यांत ॥ वरी घातली बहुत काष्ठें ॥ २६ ॥ गेला शिवदासाचा प्राण ॥ पद्मिनी जाहली सावधान ॥ पाहे जंव हालवून ॥ तंव रखडवकलें असे ॥ २७ ॥ करिता जाली शंखध्वनी ॥ धांवूनि आली रांधावणी ॥ काय जालें म्हणूनि ॥ पिटिलें [illegible] ॥ २८ ॥ पद्मिनी स्त्री रुदनातें ॥ दुःखें हाणी उल्हाटातें ॥ कोणें वो रखटें केलें ज

गव्यायें॥पतिनेलाहातीं॥२९॥कोणगतिभाक्तनाची॥मजबुद्धिआठवलीकैंची॥मी
चमूळपापीणअनर्थाची॥जेंत्यासिमरणपुसिलें॥३०॥आतांकायकरूंमाये॥ह्मणूनि
मोकलीधाय॥रांडह्मणेआतांरडोनकाय॥नचुकेहोणारगती॥३१॥आतांदुःखनको
करूं॥मीतुजमेळवीनभ्रतारु॥यापरीसराज्यधरू॥आणिशाहाणासुरूप॥३२॥ना
हींसज्याचीमर्यादा॥भोगिसीसकळसंपदा॥ऐकूनिरांडेचीयाशब्दा॥कायबोलेप
द्मिनी॥३३॥ह्मणेतुझेंजिवींहेंचिहोतें॥ह्मणूनिपुसिलेंमरणातें॥घातकेलाप्राणातें
॥अंगेपापिणीपापरूपे॥३४॥आतांमीदेईनप्राण॥ह्मणूनघेतलापाषाण॥येरिवें
घेतलाहिरोन॥तोटाकिलापलीकडे॥३५॥अतिसुलक्षणतेपद्मिनी॥बहुतस्थूळतेरां
धावणी॥स्वस्थायस्तकरूनी॥चालह्मणेसंगातें॥३६॥नचलेपद्मिनीचेंबळ॥रांडेअसे
सबळ॥मगकायकरीतेवेल्हाळ॥तेंअपूर्वपरियेसा॥३७॥मगजिवींधरिलाधीर॥ह्मणे
ईसीकरूंनयेविचार॥येईलप्रधानकुमर॥तोंवरीलयेकाधाउपाव॥३८॥मनकरूनीनिः
शंक॥मेलासिपांघुरणीचाहारोकद॥कंठींहोताहाररत्नसुरेख॥तोतोडोनिघेतलाबोटसी॥
॥३९॥येथेंयेईलहरिदास॥पूर्णभरिलेच्यारिमास॥उरलेअसतीसातदिवस॥खुणतया
चीअसावी॥४०॥रांडचालेपुढारी॥दोनरत्नेंटाकिलीपलंगावरी॥निघालीविवराबाहेरी
तेथेंच्याररत्नेंटाकिलीं॥४१॥खुणेमागेंखुणटाकित॥पाठिसींझडझडांचालत॥मगकेसा
वर्तलावृत्तांत॥तोसांगरेहरिदासा॥१४२॥इतिश्रीविक्रमचरित्रे॥१०॥दशमोध्यायः॥


पद्मिनी
रंपावणी

वि॰च
१

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ पावली आपले देशासी ॥ भे
टली ग्रामवासि पाटलासी ॥ दूत मागितलें नयापासी ॥ संगतीसी परियेसा ॥ १ ॥ मार्गी
नलीहोती एक अश्विनी ॥ त्यावरी बैसविली पद्मिनी ॥ श्रुत करावयालागोनि ॥ पुढें एक
दूत पाठविला ॥ २ ॥ तेणें जाणविलीमात ॥ राजा आनंदला बहुत ॥ नगर शृंगारा ह्मणत
॥ प्रधान सेनेसी सामोरा पाठविला ॥ ३ ॥ वाजंत्र्याचा गजर थोर ॥ पाल्हाळिले रथ कुंजर
॥ पालख्या आणि छत्रचामर ॥ तेणें अंधकार पडियेला ॥ ४ ॥ चतुर प्रधान मिळोनी ॥
पालखीत बैसविली पद्मिनी ॥ दुसरे पालखींत राधावणी ॥ ऐसी आली नगरांत ॥ ५ ॥ ऐ
सी चालतां राजवीदीं ॥ एका पुढें एक विनोदी ॥ येती नगरनारी शरीरसंबंधी ॥ सुख वोवा
ळिती पद्मिनीचें ॥ ६ ॥ नृत्यांगना करिती नृत्य ॥ थेवाथेवा बागडे नाचत ॥ हडपी धर-
तांबूल वाटित ॥ प्रवेशले राजमंदिरीं ॥ ७ ॥ पालखी नेली भीतरीं ॥ रांधावणीसी निंबलो
णकरी ॥ राजा येतां ते अवसरीं ॥ क्षेम शामाइ तें देतसे ॥ ८ ॥ थोर केलें कारण ॥ रक्षिला
गे माझा प्राण ॥ तुझी आज्ञा मज प्रमाण ॥ सकळ राणिवसांत ॥ ९ ॥ थोर आनंदें नृपनाथा ॥
थाडिलपणा शामाईचे माथा ॥ करी उपक्रम कथा ॥ भोगावया पद्मिनीसी ॥ १० ॥
जावूनि यारांधावणी ॥ पद्मिनीचे लागी कानीं ॥ एरि ह्मणे ह्मांसोनी ॥ हें चि माझे मनीं असे
॥ ११ ॥ हा घडावया सारस ॥ ह्मणे म्या केला असे नवस ॥ नवरात्र नव दिवस ॥ पौर्णिमेसी

पारणेंकरावें ॥ १२ ॥ सिद्धपावलियानवमासि ॥ पारणेंहोईलपौर्णिमेसि ॥ मगतूंजेआज्ञा
करिसी ॥ तेंमीशिरींवंदिन ॥ १३ ॥ नंवरात्रघटधरावा ॥ नवसमाझासिद्धन्यावा ॥ इतुका
कार्यवादकरावा ॥ तूंमाझीप्राणसखी ॥ १४ ॥ रांधावणीह्मणेरायासी ॥ इतुकेदिवसकैसा
होतासि ॥ दाह्मादिवसधरधीरासी ॥ मगसुखेंभोगीपद्मिनी ॥ १५ ॥ पौषमासिच्वेंअसेन
वराच ॥ तुजकारणेंह्मेंनवसिलेंव्रत ॥ पुरलेचित्तिचेमनोरथ ॥ तुजसारिखाभ्रतारला
धला ॥ १६ ॥ तेंमानलेंरायासी ॥ बोलाऊंपाठविलेब्राह्मणासी ॥ तेआणिलेपद्मिनीपासी
॥ जपयासिसांगावा ॥ १७ ॥ उभारिलाराजमंडप ॥ ब्राह्मणकरितीतुळजाजप ॥ आप
पाबैसलीघटासमीप ॥ करीध्यानअंबेचें ॥ जयजयतुळजापुरनिवासिनी ॥ झडक
रीतूंपावेमजलागोनि ॥ महिषासुरनाशिनी ॥ आद्यपीठअंबेतूं ॥ १९ ॥ जयजयतूंआ
द्यमूर्ती ॥ सकळतुजपासूनउत्पत्ति ॥ देवेंद्रादितुजस्तविती ॥ मुनिजनवर्णितीकी
र्तितुझें ॥ २० ॥ ब्रह्मादिकांनकळेपारु ॥ शास्त्रपुराणांअगोचरु ॥ शेषसिणलाथोरु ॥
स्तविताजिव्हाद्विभाग ॥ २१ ॥ तूंपरब्रह्मयोगिनी ॥ लक्षलाविलेंषड्दुर्णी ॥ शोधितां-
चारसाह्मअठराजणी ॥ तुझापारनकळेचि ॥ २२ ॥ महाकाळीकाळरूपें ॥ तुजदेख
तांकाळकांपे ॥ वेदमातेशक्तिरूपें ॥ श्रीभवानीजगदंबे ॥ २३ ॥ तुवांदिधलारामासि
वरद ॥ राक्षसाचाकरिसीलवध ॥ सोडविलादेवांचाबंध ॥ पराक्रमेंतुझेनी ॥ २४ ॥

शि॰ न॰
१

तुझीकृपाजयाघडे ॥ तरींसिद्धरीकडीजोडे ॥ वेंचितांवाटेचेखडे ॥ तेमणीहोती
निघांत२५ नूंजरींकरिसीवंकटदृष्टी ॥ तरींत्रिकुटासिपडेनिटी ॥ हेंब्रह्मांडगोळाचि
गोष्टी ॥ कायसीहेंक्षमात्रें ॥ २६ ॥ तुझेंलक्षवेनारूप ॥ सिद्धसाधेनास्वरूप ॥ भावि
तांसंकल्पविकल्प ॥ तुझापारनकळेचि ॥ २७ ॥ योगियासीतुझेंध्यान ॥ सिद्धासि
तुझेंचिंतन ॥ मुनिजनकरितीस्तवन ॥ तुझेंचिजाणअंबिके ॥ २८ ॥ तूंध्यानतूं
धरणी ॥ तूंजीवनतूंजिवाचीखाणी ॥ तूंमायतूंमोहिनी ॥ अहोमायेअंबिके ॥ २९
॥ वाचाऐकूनिश्रवणीं ॥ थोरउल्हासलीमनीं ॥ मजतुष्टलीभवानी ॥ भय-
नाहींकाळाचें ॥ ३० ॥ ऐसीजंवस्तुतिकरी ॥ तंवअदृश्यवाचाजाहालीअं
तरीं ॥ ह्मणेपद्मिनीचिंतानकरी ॥ तुजशिवदासहरिदासभेटती ॥ ३१ ॥ न-
स्वीकारीउदकअन्न ॥ घालूनबैसलीपद्मासन ॥ ऐसेंमांडिलेंनिर्वाण ॥ हृद-
यींध्यानरेणुकेचें ॥ ३२ ॥ आलियायात्राह्मणातें ॥ नमनकरीआदरेंबहुतें ॥ गंध
धूपदीपतांबूलातें ॥ आपुल्याकरेंसमर्पी ॥ ३३ ॥ इतुकेंतेथेंवर्तलें ॥ तंवहरिदा
सेंकायकेलें ॥ रात्रींस्वप्नतेंदेखिलें ॥ निजचित्तशिवदासाचें ॥ ३४ ॥ थोरका-
साविसजाहाला ॥ मगउठूनिबैसला ॥ ह्मणेस्यानेंभ्रमहोताकेला ॥ चहूंमासायेई
नह्मणूनी ॥ ३५ ॥ तरींआजिभरलेचारिमास ॥ उरलेअसतीसातदिवस ॥ आ

ज्ञापुसोनगुरूस॥ जाईनमीझडकरी॥ ३६॥ उदयातेंपावला दिनकर॥ ऋषीस केलानमस्कार॥ सांगितलास्वामिन्वाविचार॥ नेमहोताचौमासांच्या॥ ३७॥ आजिच्याअधिकादिवस॥ नेणोकायजालेंत्यास॥ पुनरपिनमस्कारगुरूस॥ आ तांआज्ञामजदेई॥ ३८॥ गुरूह्मणेहोयजयवंत॥ कल्पिलेंतेंहोयप्राप्त॥ उपदेशी संजीवनीमंत्र॥ आणिदेइनगमनपादुका॥ ३९॥ ह्मणेघेऊनिकरींचिंतन॥ प वसिनिःशेषचिंतिलेंस्थान॥ गुरूसीघालीलोटांगण॥ पादुकाचरणीलेईला॥ ४०॥ विवरद्वारमनीचिंती॥ तेव्हांनलगतांनेत्रपाती॥ पावलाविवरद्वाराप्रती ॥ भितरींकरीप्रवेश॥ ४१॥ अवलोकीसभवतें॥ तंव्हदेखेपद्मिनीतें॥ पलंगी देखोनीनिद्रीस्तातें॥ मगतयाजवळीगेला॥ ४२॥ पांतोंबरडपडोनीपाहे॥ तं वएकलानिर्जीवआहे॥ फिरोनिजंवलक्षनिपन्ह॥ तंवशस्त्रजळतांदेखलें॥ ४३॥ शस्त्रबाहेरकाढित॥ संजीवनमंत्रजपत॥ शस्त्रकरींघेऊनित्वरित॥ त्या चीधारापुसिली॥ ४४॥ शिवदासहोतापलंगीमृत॥ तोउठलाआंगमोडित॥ धांवूनिआलिंगनदेत॥ हरिदासातें॥ ४५॥ पुसेकायजालीपद्मिनी॥ शस्त्रासि अग्निप्रवेशकेलाकोणेंही॥ कोणआलाहोताकुट्टिणी॥ हेंमजप्रातसांगपां॥ ४६॥ शिवदासवृत्तांतसांगत॥ हरिदासमनाविस्मित॥ थोरघडलाअनर्थ॥

 

आनांकैसेंकरावें॥ ४७॥मंदिरअवघेंपाहिलें॥ होतेंजेथेंतेथेंचिठेविलें॥ तेंतैसें
चिसांपडलें॥जेथिंचेंतेथेंपैं॥ ४८॥ करोनिअवघाधांडोळा॥आलापलंगाजवळा
॥तंवरत्नेंदेखिलींडोळां॥ ह्मणेपद्मिनीच्याहाराचीं॥ ४९॥ रत्नेंहोतींपलंगीं॥तीं
घेवूनिलागलेमार्गीं॥ आलेंविवरद्वारामध्यमार्गीं॥ तेथेंच्याररत्नें देखिलीं॥ ५०॥
त्याचमार्गीचालती॥रत्नामागेंरत्नदेखती॥ हरिदासह्मणेरायाप्रती॥ आह्मापद्मिनीवश्यअसे॥५१॥दोघांजालाअतिउल्हास॥ रत्नेंवेंचोनिघालतीवोटस॥
गेलेहेमदेशास॥ तेथेंशब्दहुलागली॥५२॥वेगीपावलेहेमपुरीं॥ जालेब्राह्मणवेष
धारी॥जावूनियांमहाद्वारीं॥ द्वारपाळींरायाजाणविलें॥५३॥ वेगींबोलावूनित
यांसी॥पाठविलेपद्मिनीपासी॥ तेदेखूनितयासी॥ नमस्कारकरितीजाली॥
५४॥ केलेंचरणाक्षाळण॥गंधधूपदीपमाळासुमन॥ यथायुक्तकरीपूजन॥ थोर
ब्राह्मणह्मणोनि॥५५॥तुह्मीघटाजवळीबैसावें॥तुळजेचेंस्मरणकरावें॥जन
महातसेस्वभावें॥तिघांचेंएकचित्तपैं॥५६॥ पौषशुद्धत्रयोदशी॥ भेटजालीतिघांसी॥ मर्यादानाहींत्यासुखासी॥ तेंकोणासीकळेना॥५७॥विधियुक्तरचिलेंहोमकुंड॥होमद्रव्येंमेळविलींउदंड॥ समिधाकाष्ठेंमेळविलींप्रचंड॥ तींकुंडकाठींठेविलीं॥५८॥कमळादिनचतुर्दशी॥ ब्राह्मणस्थापितीअग्नीस॥र ३

जनीं केला प्रकाश ॥ श्रुतिवचनें करूनी ॥ ५९ ॥ अवदानें देती सकळांस ॥ वेदविधि
मंत्रघोष ॥ तृप्त केलें सर्वांस ॥ विबुधा आणि गंधर्वां ॥ ६० ॥ पूर्णाहुतिचे समयीं ॥
तें बोलाविली द्रौपदी माई ॥ ह्मणे जि तुक्या वस्त्र असती भांडारगृहीं ॥ त्या या समयीं
पूजेसी आणाव्या ॥ ६१ ॥ तंव ती गेली धांवत ॥ सकळ वस्त्रा घेऊनि राजवळी नेवित ॥ ब
हु शोभेनें शोभित ॥ त्यामध्यें पद कहीं असे ॥ ६२ ॥ रत्नें पूजा विधान ॥ पूर्णाहुति
केली पूर्ण ॥ ब्राह्मणांसी दिधलें दानें ॥ जें जें विधान बोलिलें ॥ ६३ ॥ मग उगवला सुप्रभा
नु ॥ शांत केला हुताशनु ॥ पाक सिद्ध जालें अन्नु ॥ सकळीं स्नानें केलीं पैं ॥ ६४ ॥ स्ना
नें केलीं होसकळीं ॥ भोजनें जालीं ययाकाळीं ॥ विडे कर्मनें परिमळीं ॥ पूजिलें ब्रा
ह्मणांसी ॥ ६५ ॥ सकळां दिली पाठवणी ॥ सत्वर जे विलोपांचिनी ॥ गृहांत बोला
विली राधा वणीं ॥ तें अपूर्व परियेसा ॥ ६६ ॥ निसह्मणे थोर कार्य बाद केला ॥ नव
सिला नवस फळला ॥ कोहीं उतराई नव्हे तुज ला ॥ नाउवे मममानसीं ॥ ६७ ॥ त्वां
केला उपकार ॥ जन्मवरी न पडे विसर ॥ आतां पूजा तुझी करूं सत्वर ॥ ह्मणोनि आसनीं
बैसविली ॥ ६८ ॥ हळू वळावलें कपाट ॥ हरिदासासि सुणावी वर वंट ॥ आधीं पूजी मस्तक
ल्हाट ॥ मग गात्रें पूजावीं ॥ ६९ ॥ हातीं पेतली कवाडअर्गळा ॥ मस्तकीं घाव दिधला स
बळ ॥ तेणें रांड जाली व्याकुळ ॥ दुसरा घाव दिधला ॥ ७० ॥ जीव गेला किंवा आहे ॥ -

अगंठेनेंहाःलवीनापाहे॥ यमलोकींचिरंजीवहोय॥ नर्कभोगीयथेष्ट॥ ७१॥ मगतें
उताणीपाडिली॥ हृदयींअगंठाठेविली॥ शामाईचीशांतिकेली॥ भोगींसोहाळेप
द्मिनीचे॥ ७२॥ वस्ताहोत्याअनेक॥ त्याघेतल्यासकळीक॥ पद्मिनीलेइलीपदक॥
अतिआनंदेंकरूनी॥ ७३॥ हरिदासेंपादुकाघातल्यापदीं॥ दोघेंबैसलींदोहींस्कंधीं॥
लयलावोनीश्रीगुरुपदीं॥ विवरद्वारींचिंतलें॥ ७४॥ उडालाअंतरगत॥ विवरद्वापाव
लात्वरित॥ पद्मिनीजालीविस्मित॥ थोरगतिपादुकांची॥ ७५॥ तिघेंप्रवेशलींविवरीं
॥ मग्रहेमनगरींकायकरी॥ तेंकथासविस्तरी॥ श्रोतेजनेंपरिसावी॥ ७६॥ अस्तमा
नागेलादिनकर॥ रांधावणीसबोलावीब्राह्मणनृपवर॥ राणिवसांकेलाहाहाकार॥ त्या-
ह्मणतीपद्मिनीकडेअसेल॥ ७७॥ धांवतआलेदूतनिकट॥ तंवकपाटलाविलेंबळकट
॥ शब्देंबोलतीउत्कट॥ परिकोणीनेदीप्रत्युत्तर॥ ७८॥ रायासमातजाणविली॥ कवाडेंदे-
खोनिघातरिवळी॥ लोटितहोतेमहाबळी॥ परिकदाउघडेना॥ ७९॥ हांकमारिल्यायो
रशब्दीं॥ परिकोणीप्रत्युत्तरनेदी॥ बरवीकराह्मणेशब्दी॥ भितरीनिघोनपाहावें॥ ८०
राजाआलाअतितांतडी॥ मडकरीआणविलीकुराडी॥ नलगतांअर्धघडी॥ दोन्हींक
पाटेंफोडिलीं॥ ८१॥ तंवभितरीपाडिलासेरांधावणी॥ करचरणपसरोनिउताणी॥ ते
थेंनदेखतीपद्मिनी॥ वस्ताआणिपदक॥ ८२॥ आहाकटकटाकरी॥ कोणीनेलीप

यिनीसुंदरी ॥ शामाईजालिहेपरी॥ हारविल्यावस्त्तापदकपैं॥ ८३॥ आंगधरणीवरटा
किलें ॥ दुःखेंहृदयपिटिलें॥ ह्मणेनिधानहातिचेंगेलें॥ आतांकायजिणेपैं॥ ८४॥ जें
कार्यनव्हे प्रधानासी॥ तेंसाधलेंरांधावणीसी॥ इतुकापराक्रमकोणासी॥ स्यानाहींदे
खिला॥ ८५॥ रुदनकरीनानापरी॥ प्रधानसंबोखीउत्तरीं॥ तुजआयुष्यझालेंपरी॥ द्र
व्यराशिकितीमिळत्तील॥ ८६॥ अमितअसेपरिवारु॥ येकादेराज्याचालापकरूं॥ ध
रीपुरुषार्थधिरु॥ उठविलाभद्ररायासी॥ ८७॥ राजानेलाप्रधानजनीं॥ तोबैसलासिं
हासनीं॥ प्रेतवाहकेंनेलीरांधावणी॥ तिसअग्निचेतविला॥ ८८॥ तिघेजणाविवरांत
असती॥ कायबुद्धियोजिलीचित्तीं॥ दोघेपडिलेचिंतावर्ती॥ मातापितयांचें॥ ८९॥
आज्ञाझालीवरुषेंबारा॥ कोणगतीमातापितरां॥ आतांजावेंनगरा॥ रत्नपुरीसीनि
र्धारें॥ ९०॥ मगठेविलादळभार॥ मेळविलाअमितपरिवार॥ रथघोडेकुंजर॥ ठेवि
ळेमोगरपायांचें॥ ९१॥ गणनानाहींद्रव्याशीं॥ हिरेमाणिकेंरत्नासी॥ पाचुपेरुजगो
मेदासी॥ वस्त्रेंआभरणेंअमित॥ ९२॥ पहिलेंहोतेरासरत्नाचें॥ अधिकआणिलेंहेंम
नगरीचें॥ देणेंनकळेशंकराचें॥ प्रयत्नेंसाधिलें असे॥ ९३॥ ऐसेंसर्वहीसिद्धझालें॥
मगतेथूनप्रयाणकेलें॥ निशाणीघावघातले॥ दुमदुमित्याप्रचंडभेरी॥ ९४॥ आले
रत्नपुरीदेशांत॥ भेटकरीजाणविलीमात॥ रायापरचक्रआलेंबहुत॥ नेणवेकोणाचें

पैं ॥ ९५ ॥ सैन्य आलें असे अपार ॥ परिकोणासि नकरिती निकर ॥ घेत आहे स्थिर स्थिर 
॥ अति निगुती करोनियां ॥ ९६ ॥ आह्मी सैन्यांत विचारिले ॥ कवणे देशीचे राजे पुसिले ॥ प
रि नफुटती गुह्य कल्होळ ॥ नाव सांगती नृपाचें ॥ ९७ ॥ परि राजा प्रधान असे निर्मळ ॥
भूतदया आणि स्नेहाळ ॥ सुंदर आणि कुशळ ॥ धर्मात्मादि सतातो ॥ ९८ ॥ परि राया नसा
वें निश्चित ॥ सैन्य करावें सावचित्त ॥ दुर्गद्वारीं चतुर्थ ॥ सैन्य ठेवावें ॥ ९९ ॥ ऐका दूताचें व
चन ॥ पाल्हाण ह्मणे सैन्य ॥ दुर्गासि केलें रक्षण ॥ परिघ वेष्टित असंख्य ॥ १०० ॥ दु-
डे हुडा निशाणें लाविलीं ॥ दारु यंत्रें पूर्ण भरिलीं ॥ काष्ट कारलें ठेविलीं ॥ बाण काठियास
जुनी ॥ १ ॥ भाले त्रिशूळ लखलखित ॥ असिलता दुधारी झळकत ॥ शस्त्र संगमीं वीर
श्री बोलत ॥ आपले प्रतापें ॥ २ ॥ राजा अति चतुर ॥ ह्मणे नाहीं श्रेष्ठ कुमर ॥ आपुले देह
जर्जर ॥ नेणो युद्ध कैसें होईल ॥ ३ ॥ परि एक सुचिन्ह होत ॥ सव्य नेत्र असे लवत ॥ आणि
दक्षिण बाहु स्फुरत ॥ हृदयीं हर्ष नसमाये ॥ ४ ॥ ऐसा हर्ष चिंतूनि नृपवर मानसीं ॥ नग
राबाहेर जा ह्मणे दळासी ॥ युद्ध करावें परदळासी ॥ अति निःशंक होवोनी ॥ ५ ॥ सैन्य
चालिलें अपार ॥ महावीर थोर थोर ॥ वीर देखते झाले वीर ॥ मग त्यांहीं काय विचारिलें
॥ ६ ॥ परदळ आलें ह्मणउनी ॥ सिद्ध झाली रत्नमणिची वाहिनी ॥ येथें होईल झोट धर 
णी ॥ नकळतां युद्ध होईल ॥ ७ ॥ ह्मणऊनि बोलाविलें दूतांसी ॥ पत्रिका दिधली तया

सी ॥ तुह्मीजाउनिवेगेसी ॥ रत्नमणिसीभेटावें ॥ ८ ॥ पत्रिकेसीलिहिलेंसविस्तर ॥ सुख
वचनींबोलावेंउत्तर ॥ शिवदासहरिदासतुमचेकुमर ॥ भेटावया आलेअसती ॥ ९ ॥ ऐसें
ऐकोनिवचन ॥ दूतींकेलेंअसेप्रयाण ॥ जैसेंवायुसंगेंपत्रजाण ॥ तैसेनगरद्वारींप्रवेशले ॥
१० ॥ द्वारींबैसलेरक्षणाईत ॥ तयासिजाणविलीमात ॥ आह्मीशिवदासहरिदासाचेदूत ॥
रायासिपत्रिकादिधलीअसे ॥ ११ ॥ द्वारपाळधेवोनिगेले ॥ त्याहींरायासिजाणविलें ॥ दो
घेदूतद्वारींआले ॥ ह्मणतीशिवदासहरिदासाचेसेवक ॥ १२ ॥ आणिह्मणती आहेपत्रि
का ॥ तेथेंसंपूर्णलिहिलेंदेखा ॥ परिसोनदूतवचनमालिका ॥ रायेंप्रधानाकडेपाहिलें
॥ १३ ॥ प्रधानह्मणेजीनृपवरा ॥ येथेंपाचारावेंहेरा ॥ पत्रिकाअसतांहस्ताक्षरा ॥ तेणें
अवघेंजाणवेल ॥ १४ ॥ आपलाअर्थवापरावा ॥ हासंशयफेडावा ॥ किंषालटाकिया
मावा ॥ परराज्यबळजिंकावया ॥ १५ ॥ तेंमानलेंरायासी ॥ बोलाऊंपाठविलेंदूतांसी
॥ हेरजावोनिदूतांपासीं ॥ रायाजवळीपातले ॥ १६ ॥ दूतेंजोहारकेला ॥ पत्रदेवोनि
उभाराहिला ॥ रायेंलाखोटाउघडिला ॥ वाचिनाझालातेकाळीं ॥ १७ ॥ लिहिलेअसे
समूळ ॥ आगमनिगमसकळ ॥ राजाप्रेमेंदाटलातुंबळ ॥ अश्रुपातनेत्रींदळती ॥
१८ ॥ अवघेंआणिलेंमनासी ॥ मगपत्रदिधलेंप्रधानापासीं ॥ तेणेंचरित्रवाचितां
त्यासी ॥ प्रेमनधरतआले ॥ १९ ॥ ह्मणतीचलाआतांजावें ॥ निशाणींघातलाघा

वो॥ केलाथोरमहोत्सावो॥ सारवरवांटितेजाहाले॥२०॥ श्रृंगारिलेंनगर॥सन्निधके लादकभार॥राजाच्यालिलासामोर॥ वाद्येंअपारगर्जती॥२१॥ सैन्यसैन्याजाहालीभेटी॥ काठिकराचीफिरेघिरटी॥ मध्येंदाटलीहोतीदाटी॥ तेवारितेजाहाले॥२२॥ शिवदासहरिदासचरणचाली॥राजाउतरलाअश्वातळीं॥ शिवदासेंमस्तकठेविलेंचरणकमळीं॥ रायेंवक्षस्थळीआलिंगिला॥२३॥ हरिदासेंतेणेंचरितीं॥ माथाठेविला चरणाप्रती॥ ऱ्हदयींधरिलाअतिप्रीती॥ मगप्रधानासिभेटले॥२४॥ मातेसिकरितीदंडवत॥ त्यास्नेहलोटलाअद्भुत॥ हारपलीहोतींमाझीरत्नेंअद्भुत॥ तींपूर्वदत्तेंकरूनिसांपडलीं॥२५॥ सकळांसिजाहालाभेटी॥आनंदनसमायसृष्टीं॥ थोरदाटलिसेदाटी॥ परस्परेंकरितीनृत्यातें॥२६॥ ऐसेप्रवेशलेनगर॥ राजमंदिरींजाहालाबैसकार॥ कथितेजाहालेसमाचार॥जोजोहोता-वितला॥२७॥ जाहालियाआंघोळीआरोगणा॥ दिनगेलाअस्तमाना॥ ॥ निशापतिसहिततारांगना॥ उदयातेंपावला॥२८॥ ऐसीहारिलीतीरजनीं॥ सूर्योदयजाहालागगनीं॥ स्नानसंध्याकरोनि॥ कायकरीनृपवर॥२९॥ राज्यपट्टदिधलाशिवदासासी॥ प्रधानत्वस्थापिलेहरिदासासी॥ पद्मिनीमिर

वलीराणिवसी॥ वडिलमानदेखोनियां॥ ३०॥ तींस्फुरवेंराज्यकरिती॥ रायाप्रधानांअ-
तिप्रीति॥ इतुकीकथासांगुनी॥विक्रमाप्रती॥।चित्रिस्वाचित्रीमयूरगेली॥३१॥ऐका-
पुढीलकथेचेंअनुसंधान॥ त्यारुचित्रांगीचेंकथन॥ राजहंसकरवीलश्रवण॥ तेंसां
गरेहरिदासा॥ ३२॥ इतिश्रीविक्रमचरित्रकथा॥ हरिदासहोयसांगतां॥तेऐका
वीश्रोतां॥ स्वस्थचित्तेंकरूनियां॥ १३३॥ ॥इतिश्रीविक्रमचरित्रेयेकादशो
ऽध्यायः ११ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ६ ॥

श्रीगणेशायनमः॥ मयूरचित्रांचीकथा संपली॥ रात्रिंप्रहरएकउतरला॥ राजहंसेंचित्रिं ठूनिउडा
ला॥ येऊनबैसलाचौरंगीं॥ १॥ सुखांकुरबाळकरी॥ पंखझाडीवरच्यावरी॥ पद्मिनीअतिहास्य
करी॥ सवपंकांतिदेखोनी॥ २॥ विक्रमह्मणेगापक्षिंद्रा॥ शरीरींव्यापलीसेनिद्रा॥ कांहींविनो
दकथाशब्दमात्रा॥ कथितांनिशाहरेलपैं॥ ३॥ पक्षिबोलेप्रतिवचन॥ जरींआज्ञादेईलपद्मिण॥
तरीसांगेनपवित्रकथन॥ च्यारुआणिचित्रांगीचें॥ ४॥ पद्मिनीसिलागलीचटपटी॥ ह्मणेक
थासागरेंगोमटी॥ राजहंसचंचुपुटी॥ दोनरेखावोढित॥ ५॥ कथाऐकासावधान॥ एकचित्तक
रूनमन॥ इंद्रानेंइंद्रभुवन॥ तेथेंअपूर्ववर्तलें॥ ६॥ तेतिसकोटीदेवांसहित॥ सभेबैसलाअमर
नाथ॥ नारदतुंबरासहित॥ नृत्यकरितीनायका॥ ७॥ टाळमृदंगविणा॥ स्वरसगीतगायना
॥ वैंकटअवलोकीइंद्रराणा॥ तंवतीअलीचित्रांगी॥ ८॥ सामोरदेखुनिसहस्रनयनातें॥ स्तुति
तीजालीमुनिचरणातें॥ इंद्रेंरवुणाविलेदंडधारियातें॥ नृत्यकरीह्मणोनियां॥ ९॥ येरीसावध
ठायांचे॥ कांसघालीपितांबराची॥ ध्वनीकेलीस्वराची॥ तांडवनृत्यआरंभिलें॥ १०॥ उत्त-
मरागआळविला॥ थैंथैशब्देंडोलदिधला॥ भूमीसिनमूनसकळां॥ करकमळींनमिती-
जाली॥ ११॥ धीमधीमटाळमृदंग॥ सर्वश्रुतिचासंयोग॥ रंगींवोदविलारंग॥ इंद्रनटस्थपा
हातसे॥ १२॥ नृत्यामध्येंनृत्यकरी॥ उल्हाळदेवूनिदेतभोंवरी॥ तंवअवचितांआलीच्यांचरी॥ १
गांठनपडेटाळमृदंगा॥ १३॥ तेंतंवदेखूनिसहस्रनयनीं॥ कोपचढलावज्रपाणी॥ ह्मणेमरम

रगेपापिणी॥ तूंजायमृत्यलोकीं॥ १४॥ चित्रांगीजालीभयाभीत॥ साष्टांगीं घालीदंडवत॥
तुझेंवचननव्हेअसत्य॥ उश्रापघावास्वामियां॥१५॥ नानाकरुणेच्याध्वनीं॥ग्लानताकरी
नानावचनीं॥मीपडिलीयामृत्यभुवनीं॥ कोणधांवाकरील॥१६॥यावरीशक्रबोलेवचन॥नृ
जराजकुळींहोईलजनन॥ द्वादशावर्षीहोईलज्ञान॥ तीस्वुणऐकसंदरी॥ १७॥ जोसांगेलाचि
त्रकुळींचासमाचार॥ तोचवरीलतुजवर॥ वचनाचामानीनिर्धार॥मगभेटसीआह्मासी॥१८
चित्रांगीनेंशापअंगिकारिला॥मगत्यासिनिरोपुसिला॥ ह्मणेआज्ञादेयींगावहिला॥अति
चिंतातुरमानसीं॥१९॥ तंवदिनजालाअस्तमान॥ केलेंसचैलस्नान॥ वेगींसारिलेंभोज
न॥मंचकींपहुडली॥ २०॥ आत्माानिघालातेथुनीं॥ तोउतरलामृत्यभुवनीं॥ तेमंदाकि-
नीच्यास्थानीं॥ कांचनपुरीप्रवेशला॥ २१॥ तेथीलराजाचक्रदंतु॥ त्याचीस्त्रीहोतीऋ
स्नातु॥स्वखसेजेराजादेतांरुतु॥ तंवउदरींचित्रांगीप्रवेशली॥ २२॥ ऋतुसंपूर्णजाला
॥तोचराणीसगर्भराहिला॥ तंवप्रातःकाळजाला॥ रायेंसारिलेंसंध्यास्नान॥ २३॥ चा
लवीआपलाराज्यभार॥ राणीजालीगरोदर॥ दोहाळेयाचेंकोडसमग्र॥ पंचमसमास-
लोटले॥२४॥पूर्णभरलेनवमास॥ चैत्रशुद्धत्रयोदशीस॥रविवारींघटिकाद्वादश
॥राणीरात्रींप्रसूतजाली॥ २५॥ उपजलेंकन्यारत्न॥सुलक्षणावंशीगुणासंपूर्ण॥ करि-
तोजन्मनामकरण॥सूर्यउदयातेंपावला॥२६॥ कन्याजालीप्रथम॥रायेंकेलादानधर्म

केलेंपंचमरात्रीसत्कर्म॥ दाहाअकरादिवसजाले॥ २७॥ दिवसोंदिवसवाढोंलागली॥ आ
ठवर्षांचाजाली॥ शयानेंआदरिली॥ वरविचारणातेधवां॥ २८॥ पाठविलेंप्रधानासी॥ हिंज
हिंडतीदेशोदेशीं॥ कांटतनयेकोणहासीं॥ ऐसींवर्षेअकराक्रमिलीं॥ २९॥ राजाअतिचिंता
तुर॥ कन्याजालीउपवर॥ थोरपडलाविचार॥ आतांकैसेंकरावें॥ ३०॥ वर्षेपूर्णभरलिंद्वा
दश॥ ज्ञानजालेंकुमारीस॥ बोलावूनचक्रदंतास॥ कायसांगतीजाली॥ ३१॥ माझेंआरंभा
वेंस्वयंवर॥ देशोदेशींचेबोलावानृपवर॥ ध्वजस्तंभउभाराथोर॥ त्याससहस्रमोटळीबां
धावी॥ ३२॥ वित्पत्तिलिहिजेमूळपत्रिकेची॥ मोटळीतोडावीध्वजस्तंभाची॥ वार्त्तासां
गेलाचित्रकुंडीची॥ तयासिकन्याअर्धराज्यदेयीन॥ ३३॥ इतुकेंहिलिहिलेंपत्रिकेसी॥
मुळेंपाठविलींरायांसी॥ चक्रदंतसंतोषलामानसीं॥ तात्काळबांधेसहस्रमोटळी॥ ३४॥ हां
कारिलेबहूतदूतांतें॥ तयाजवळदिधलींलिखितें॥ हांकारावेंरायातें॥ देशोदेशींचिया॥
३५॥ दूतदेशांतरागेले॥ रत्नखचितस्तंभउभारिले॥ नगरअवघेंशृंगारिलें॥ तयेकाळीं॥
३६॥ दूतींदिधल्यापत्रिका॥ वाचूनिविचारितीयेकमेकां॥ ह्मणतीजिवेंजावेंस्वर्गलोका
॥ हेंतोंअवघडअसे॥ ३७॥ पूर्वीआइकतअसोंवित्पत्ति॥ पणकेलाजनकवर्त्ती॥ कोदंडका
नाडीवोढावीपुढती॥ तयासिजानकीसमर्पावी॥ ३८॥ तेपासूसोनियांमात॥ स्वयंवराआ
लालंकानाथ॥ तोगर्विष्ठजालाबहुत॥ वोढोंपाहेधनुष्यातें॥ ३९॥ थोरआवेशलेलंकाना २

ख॥ मुष्टिघालीधनुष्यांदेख॥ क्रोधेंनधरवेत्र्यकक॥ वक्षस्थळींउलंडलें॥ ४०॥ कस्वर-
णरावणझाडित॥ अशुन्दमुखेंतेव्हांवमत॥ तेंदेखूनिगाधिसुत॥ रघुनाथासिउठवि
लें॥ ४१॥ तोवचनमात्रेंउठिला॥ वामांगुष्ठउचलिला॥ धनुष्यकाढीतयेवेळ॥ रावणत्हृद
यींचें॥ ४२॥ धनुष्यरामेंकाढिलें॥ दशग्रीवाजीवदानदिधलें॥ तंवविश्वामित्रबोलिले
॥राघवावोढित्र्यंबकासी॥ ४३॥ ऐकूनिगुरुवचनपरवडी॥ मगरामेंकाढिलेंधनुष्यवो
ढी॥ तेपरिसोनियांकडाडी॥ दिग्गजकांपिंनलें॥ ४४॥ मगरामासिमाळघालीसीता॥
कन्यादानकरीजनकपिता॥ इतुकीऐकिलीहोतीकथा॥ परिअंसापणकोठेंऐकिलाना-
हीं॥ ४५॥ द्रुपदेंकलेंस्वयंवरातें॥ राधायंत्रमांडिलेंहोतें॥ तेंभेदिलेंपांडवसुतें॥ महा
वीरअर्जुनें॥ ४६॥ तिसरापणऐकिलाभृगुवंशीं॥ सहस्त्रश्यामकर्णदेवोनिऋषीश्वरा-
सी॥ परणूनिआणिलेंसत्यवतीसी॥ ऋषीकमुनीश्वरें॥ ४७॥ हापणमांडिलाअवघ
ड॥ दिसतसेकोहंडहूट॥ स्त्रियामिळतांउदंड॥ पृथ्वीवरीकायदुकाळअसे॥ ४८॥ सां
डुनिअष्टभोगऐश्वरी॥ कोणात्रिकुटाजावयाचेपरी॥ कायकरावातेनवरी॥ ऐसेंदूतां
प्रतिबोलती॥ ४९॥ परतोनिआलेदूत॥ रायातेंप्रत्युत्तरसांगत॥ थोरजालाव्यथाभूत
॥पुढेंकैसेंवर्त्तलें॥ ५०॥ चारठाणनामनगरीं॥ तेथेंनानावटिव्यवहारकरी॥ भार्यागुण
वंतीसुंदरी॥ पुत्रअसतीतिघेजण॥ ५१॥ वडिलानावकोटेश्वरु॥ तयाधाकटालक्ष्

श्वरू॥ कनिष्ठकुमारनामच्यारू॥ लाडिवाळ्म्हणूनठविलें॥५२॥ पिताअतिप्रीतिकरी॥ लाडचालवीनानापरी॥ येरू द्रव्यानाशकरी॥ पिताकांहींन म्हणेपें॥ ५३॥ तोरेवेके द्यूत-कर्मासीं॥ हारवीद्रव्याच्याराशी॥ पितापुरवीतयासी॥ धाकटाकुमरम्हणऊनि॥५४॥ ऐसानांदतांबहुतदिवस॥ नवज्वरजालाव्यव्हारियास॥ भरलेंपूर्णआयुष्य॥ तेंतयासी-जाणवलें॥ ५५॥ जवळिबोलाविले दोघेपुत्र॥ चारुनिरविज्ञाबहुत॥ द्रव्यअसेअपरमित॥ कांहींप्रपंचडनकाकरूं॥ ५६॥ चारुमाझाअत्यंतलाडका॥ यासिपुरवोपैसाटका॥ म्हणोनिसांगतोंतुम्हाआवांका॥ याच्यारुपुत्रांचा॥ ५७॥ चारुधाकुटाअसेनेणता॥ जंववरी होयजाणता॥ तंववरीपूर्वीवेंद्रव्यार्था॥ भेदाभेदनकरावा॥ ५८॥ सांडोनिसर्वभावनातें अवसरीं॥ व्यव्हारीदेहविसर्जनकरी॥ पुत्रउत्तरकार्यकरी॥ औजोर्ध्वदेहिबोलिला॥ ५९॥ जालेद्वादशतेरादिवस॥ सपिंडीमिळविपित्रांस॥ पक्षिकअष्टादशादिवस॥ क्रमलाबरेवियापरी॥ ६०॥ ऐसेतेपुत्रपौत्रींनांदत॥ चारुचानेमपाळित॥ द्रव्यअर्थपुरवित॥ प्रीतिकरोनियां॥ ६१॥ बंधुसिकविंतिमधुर वचनीं॥ आपलेंस्वकर्मउत्तमकरुनी॥ द्यूतकर्मदेसोडोनी॥ येणेंअपवादफारअसे॥ ६२॥ द्यूतकर्मजेकरिती॥ तयांचीजायअर्थसंपत्ती॥ दरिद्रदशाहोयप्राप्ती॥ खेळखेळोंनयेहा॥ ६३॥ पाहेपूर्वी धर्मराजखेळला॥ राज्यअर्धहारविला॥ बारावर्षेंवनवासकेला॥ तेरावेंनष्टचर्य

गुमरूपें ॥ ६४ ॥ पांडवांसारिख्या घडलीदशा ॥ आमचा कोणता भरवंसा ॥ हारवेळ
सांडावासहसा ॥ आजपासोनि बंधुराया ॥ ६५ ॥ बंधु करिती खटपट ॥ त्यारुन सोडी
घूतस्पष्ट ॥ द्रव्य हारविलें उत्कट ॥ तेंपुरवी सहोदर ॥ ६६ ॥ ऐसा सिकाविला नाति
उत्तरीं ॥ परि तो अणुमात्र जिवींन धरीं ॥ लोक सांगती परोपरी ॥ परि तो न आइके को
णाचें ॥ ६७ ॥ ऐसा तो कोणे एके दिनांतरीं ॥ द्रव्य हारविलें सहस्र वरी ॥ सवें घेवोनि जु
हारि ॥ द्रव्य कोटेश्वरासी मागतसे ॥ ६८ ॥ तेणें बहुत निर्भीछिला ॥ त्वां द्रव्य अर्थ सा
निस्य ॥ जो ठेवहोता ठेविला ॥ वडीलंचा पे ॥ ६९ ॥ तूं जाहालासी सोळावर्षाचा ॥ छ वलेश नाहीं
उदिमाचा ॥ छंद लागला द्यूत कर्माचा ॥ कोठून द्रव्य तूं जद्यावें ॥ ७० ऐसा नानापरी हेडसावि
ला ॥ निष्ठुरवचनी ताडिला ॥ जाईजांईरे घरा बाहेर वहिला ॥ नदा रवीं मुरव कमळा ॥ ७१ ॥
कोटेश्वरें दवडिला रागें ॥ जुहारी लागलासे मागें ॥ येवोनि तत्प्रसंग ॥ मांगलक्षे-
श्वरासी ॥ ७२ ॥ तेणें हें ही केलें बहुत वाहरी ॥ क्षोभला नानापरी ॥ हें चंदा रिवलें जन्म
वरी ॥ ठेवा सारिला वडिलांचा ॥ ७३ ॥ येवढा थोर जाहालासी ॥ हारविल्या द्रव्य
रासी ॥ आह्मी मेळवितों कष्टेसी ॥ रुक्म नरुक्या पें ॥ ७४ ॥ तुज नाहीं रे अभिमान
वोज ॥ जालासि अत्यंत निर्लज्ज ॥ द्रव्य मागों आलासि मज ॥ कायपेंठ वलें होतें त्वां ॥
७५ ॥ ऐसा कठोर वचनीं ॥ त्यारु रवें चलाशब्द बाणें ॥ तेणें थोर दरववला अंतःक

णीं॥ मगजुवारियासिकायबोले॥ ७६॥ ह्मणेआजिचादिवसजावें॥ उदईककयेईन
द्रव्यस्वभावें॥ हेंवचनसत्यमानावें॥ थोरउपकारहोईल॥ ७७॥ जुवारीआपल्या
गृहासिआला॥ मार्तंडाचाअस्तजाला॥ उपवासीअसेभुकेला॥ मगप्रवेशलारा
णिवसा॥ ७८॥ निघालानिजमंदिरांत॥ राणीउपवासीवाटपाहात॥ स्नानासिउ
दकदिधलेंत्वरित॥ झडकरीसारीआरोगणा॥ ७९॥ तेहीजेवलीसत्वर॥ सेजकेली
मनोहर॥ विडियादेतसेसुंदर॥ अतिलावण्यसयेचें॥ ८०॥ तिचीवर्णावीस्वरूपता॥ रं
भाउर्वशीचीसाम्यता॥ हेआगळीपतिव्रता॥ सीतासावित्रीसमान॥ ८१॥ पतिची
सेवाकरी॥ पूजितीजालीकोमळोत्तरीं॥ कायचिंतावर्तलिसेअंतरीं॥ तेमजप्राणे-
सांगिजे॥ ८२॥ ह्मणेवल्लभेएककांते॥ आजिरवेळलोंबहुतद्युत॥ द्रव्यहारविलेंब
हुत॥ मागोंआलोंबंधुसी॥ ८३॥ त्याहींधरिलीद्रव्यआस॥ मजकेलेंउदास॥ कठिण-
शब्दबहुवस॥ निंदोनियांबोलिले॥ ८४॥ मगमीजुवारियासिसंबोखिलें॥ उदयीक
देईनह्मणतिलें॥ तेव्हांमाझेंयेणेंजालें॥ मंदिरासीपैंकांते॥ ८५॥ तरीउदयीकजुवा
रियासी॥ गतिकरावीपैंकैसी॥ चारुचिंतातुरमानसी॥ देखूनिप्रियाकायबोले॥
८६॥ ह्मणेअहोजीप्राणपति॥ परिसावीयेकाविनंती॥ माझेअलंकारआहेती॥ ते ४
जुवारियासीदेइजे॥ ८७॥ इतुकानेमकेला॥ तंवसूर्यउदयजाला॥ जुवारीबोलावूनि

आणिला॥ द्रव्य घेह्मणूनि आपुलें॥ ८८॥ हिशोब केला पंचोत्तरी॥ सहस्रांचा लेखा भारी॥ तितुकें दिधलें करीं॥ तेणें जुवारी संतोषला॥ ८९॥ मुद्दल द्रव्य घेई माझें अंकित॥ लटकें न बोलें गा यथार्थ॥ चालमाझियासांगातें॥ तुझा खर्च चालवीन॥ ९०॥ थोर दाखविली आस॥ निरोप पुसे कांतेस॥ मीजात असें उदीमास॥ तूं कांहीं चिंता न करावी॥ ९१॥ येरु करुणा वचनें विनवी॥ माझी आठवण असों द्यावी॥ कायसिद्धि होईल बरवी॥ ऐसें मज गमतसे॥ ९२॥ अष्टभोग प्राप्त होती॥ आशणुकन क्षेराजा निती॥ तेणें मोहेल चित्तवृत्ती॥ तेथें माझी आठवण केविहोइल॥ ९३॥ मीजी तुमचें अर्द्धांग॥ कोणाचा न करी पांग॥ मनीं ध्यातसें श्रीरंग॥ तो जयतुह्मा देईल॥ ९४॥ जैसा कृष्ण व्यापक चराचरीं॥ राहाटे सोळा सहस्रपरीं॥ परी रुक्मिणी-च्या अभ्यंतरीं॥ सदोदित भरला असे॥ ९५॥ तैसें मज करावें सनाथ॥ न विसरावें अंतर्गत॥ जरी लक्ष जोडला अर्थ॥ परी माझा विसर न पडावा॥ ९६॥ ऐसी करुनियां विनवणी॥ माथा ठेवि-ला पतिच्या चरणीं॥ येरें हृदयीं आलिंगूनी॥ अश्वासन दिधलें॥ ९७॥ बांधिली शकुनगांठी॥ कांता अवलोकिली कृपादृष्टी॥ तूं आहेस माझ्या कंठीं॥ जाणें कौस्तुभ बाणला॥ केलें स्त्रिये-चें समाधान॥ हृदयीं स्मरे हरिचरण॥ मग केलें प्रयाण॥ उत्तरदिशे पारियेसा॥ ९९॥ दिवसा मार्ग चालती॥ रात्रीं एखादे ठायीं विश्रांती॥ भेटलिया तीर्थप्रती॥ करिती स्नान दान॥ १००॥ सवें असे तो जुंवारी॥ तंव पावले कंचनपुरी॥ स्नान करूनि मंदाकिनितिरीं॥ आरोगणा सारि

ली॥१॥पारसलीसहस्रमोटळीचीमात॥मगप्रवेशलानगरांत॥वसलेहोतेराखणा
ईत॥तयांसिपुसनाजाला॥२॥त्यांहींसांगितलावृत्तांत॥चारुहर्षलाबहुत॥ह्मणेजुवा
रीयाचाफेडावाअर्थ॥पुढेंराजाकरोंम्हलतेंची॥३॥ह्मणूनिराजाउठिलासत्वरी॥राजद्वा
रींचीत्याटिलीफेरी॥वळंघलाध्वजस्तंभावरी॥सोडिलेंसहस्रमोटळितें॥४॥श्रोतेह्मण
तीयेकायेकां॥कैसीतोडोदिधलीसेवर्का॥नविचारितांअविवेकी॥हेंकारणसांगावें॥
५॥कविह्मणेजीसकळ॥पूर्वींरायासिपाठविलेंमूळ॥तेंहेरखोवोनिआलेसकळ॥स्वयंव
रानयेतिकोण्हीं॥६॥तेरायासिपडलीचिंता॥मगजालाडांगोरापिटता॥सहस्रमोटळी
सोडोम्हलता॥तयासीकोण्हींन वर्जावें॥७॥जोगीजंगमसन्यासी॥मंगळडोरकरजो
सी॥तडीतापडीकुब्जकासी॥पांगुळादिकनवर्जावें॥८॥ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र॥तेली
तांबोळीकुंभार॥यामध्येंमोटळीफेडीनर॥त्यासीकोण्हीनवर्जावें॥९॥इतुकीजोलीहो
तीनिगुती॥पूर्वींचिसांगीहोतीदूतांप्रती॥यदर्थीराखणाइतीं॥चारुलागीवार्जिलेना
हीं॥१०॥श्रोतेह्मणतीफिटलासंदेह॥पुढीलकथेचासांगेनभाव॥जयाअसेलअनुग्रह
भाव॥तयासिकांहींअशक्यनाहीं॥११॥कविसांगेलपुढीलकथा॥चारुउत्तरेस्तंभारवा
लता॥जुवारियासिद्रव्यजालादेता॥तोआपुल्यानगरागेला॥१२॥रक्षपाळींकायकेलें॥
चारुसरायाजवळीनेलें॥चक्रदत्तेंआपणाजवळिबैसविलें॥अतिसन्मानेंकरुनियां१३

विडादेऊनिकर्पूरेंसी॥ चारुपाठविलाशणीवसी॥ राजकन्यापाहेतयासी॥ रूपदेखूनिसं-
तोषली॥ १४॥ दृष्टिनपुरेलक्षितां॥ सरलीअवतारांचीचिंता॥ जरमजत्रिकुटिचीसांगे
लकथा॥ तोन्हवरमजवरी॥ १५॥ मगउठूनियांआदरकरी॥ बैसोंघातलाचौकसुंदरी॥
विडादेवूनिकोमळउत्तरीं॥ पुसेचित्रकुटिचीवार्ता॥ १६॥ येरुह्मणेपहिलागेलोंइंद्रभुवनीं
॥ कांहींयेककार्यविचारणाहोतांमनीं॥ मार्गीजातांचित्रकूटभुवनीं॥ दुरूनिदेखिलें-
होतें॥ १७॥ त्यागोष्टिसींदिवसजालेबहुत॥ कार्ययोजनींहोतेंचित्त॥ कांहींआठवतन
ठवन॥ मनामध्येंजाणपां॥ १८॥ जरीहीपूर्वीसूचनाअसती॥ तरीपीतरीरिघूनिअव
घीस्थिती॥ पाहातोंभावभक्ती॥ नगरजनांचीपैं॥ १९॥ आतांजरीतुजअसेलइच्छा॥
तरीमीजाईनमागुतां॥ वरवेंलक्षूनिमागुता॥ तुजप्रतिसांगेन॥ १२०॥ ऐकूनिया
रुचेंवचन॥ ह्मणे मजद्यावेंजीप्रमाण॥ तेणेंहोईलसमाधान॥ मनलीनतुझे-
ठायीं॥ २१॥ चारुह्मणेबोलणेंसत्य॥ लटिकेंनबोलावेंयथार्थ॥ ह्मणूनिठेविलाह
स्त॥ मस्तकींराजकन्येच्या॥ २२॥ तेणेंसंतोषलीराजकुमरी॥ पित्यासिबोलावी
झडकरी॥ कथितीजालीवागेश्वरी॥ जीवदलाहोताचारु॥ २३॥ तेंमानलेंरा-
यासी॥ आज्ञादिधलीचारुसी॥ पुढेंकथावर्तलीकैसी॥ तेंसांगेरहरिदासा॥
२४॥ इतिश्रीविक्रमचरित्रकथा॥ हरिदासहोयसांगता॥ तेऐकावीश्रोतां॥

स्वस्थचित्तेंकरोनियां॥ १२५॥ ॥ इतिश्रीविक्रमचरित्रेद्वादशोध्यायः१२ संपूर्णमस्तु॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

श्रीगणेशायनमः ॥ च्यारूंसमुहूर्तीनिघाला ॥ राजाबोळवितचालिला ॥ ह्मणेबोलअसेबोलिला
॥ तोंकरावायथार्थ ॥ १ ॥ च्यारूनेंकेलेंदंडवत ॥ रावह्मणेव्हावेंजयवंत ॥ धरिलाअसेउत्तमपंथ
मनोवेगेंजातअसे ॥ २ ॥ करीनामस्मरणाचित्तागती ॥ पाहातजातअसेतीर्थोतीर्थी ॥ ऐ-
सापावलाअसेबद्रिकानाथीं ॥ केलेंदर्शननारायणाचें ॥ ३ ॥ तंवएकदेखिलाऋषीश्वर
॥ तयासीकेलानमस्कार ॥ तेणेंठेविलामस्तकींकर ॥ क्षेमकुशळविचारिलें ॥ ४ ॥ येरेंसां
गीतलेंसाकल्यना ॥ जैजेझालीहोतीकथा ॥ पुढेंआहेचित्रकुटिंचीवार्ता ॥ तेसिद्धपाव
वीस्वामियां ॥ ५ ॥ कृपाउपजलीमुनीसीं ॥ खूणसांगताजाहलाच्यारूसी ॥ तुवांजावें-
हिमाचळासी ॥ तेथीलऐकव्यवस्था ॥ ६ ॥ त्याहिमाचलाचेपाठारीं ॥ द्वादशयोजनेवटविस्त
री ॥ ससरवांधाअसतीवरी ॥ शाखापल्लुवअनेकपैं ॥ ७ ॥ तयावरीराजहंअसती ॥ तिघे
पुत्रतयाप्रती ॥ त्यांचीऐकावीस्थिती ॥ तिघांसितिहींलोकींगमन ॥ ८ ॥ चाराघेवूनये
तीमाध्यान्नकाळीं ॥ स्वयंपाककरीपक्षीबाळी ॥ मगपूसोनियावचनमाळी ॥ समर्पीनिवे
द्य ॥ ९ ॥ करीवैश्वदेवउपासना ॥ भूतबळीघालोनिबळिदान ॥ करूनिशुद्धआचमन
॥ बैसेभोजनासी ॥ १० ॥ अतीतभागकाढोनी ॥ तीनवेळशब्दकरोनी ॥ बैसलापंगतितिघे
वोनी ॥ करीआरोगणापैं ॥ ११ ॥ पाचारोनीतीनवेळीं ॥ अतीतनयेत्याकाळीं ॥ मग
अन्नटाकोनियांजळीं ॥ सरवेंकृष्णार्पणकरी ॥ १२ ॥ मगबैसेभोजनीं ॥ ऐसेंकरीमति

दिनीं॥ तुवांतेथेंजावूंनीं॥ अतीतरूपेंबैसावें॥ १३॥ अतीतआहेह्मणोनीं॥ पाचारील
वचनें दोन्हीं॥ तिसरेंपरिसोनीध्वनी॥ मीअसेंत्वांह्मणावें॥ १४॥ तुजनेवूनिवृक्षाव
री॥ पूजाकरीलषोडशोपचारी॥ आरोगणाचे अवसरीं॥ उगलेंचिबैसावें॥ १५॥ नोह्मणे
घ्याआपोशनासी॥ त्यासांगावेंमजकामनेसी॥ नेवोनियांचित्रकुटभुवनासी॥ मागुती
येथेंआणावें॥ १६॥ इतुकाउपदेशकेला॥ च्यारूथोरआनंदला॥ मगगुरूनेंप्रसाददिध
ला॥ कंदयेकतयासी॥ १७॥ हाजाईतूंभक्षित॥ याचेंनावअन्नकंदह्मणात॥ पूर्णहोई
लमनोरथ॥ येरुमाथाठेविचरणीं॥ १८॥ मगतेथूनिनिघाला॥ हिमाचलपर्वतापानला॥
वटवृक्षनयनींदेखिला॥ पत्रफळींमंडित॥ १९॥ पुढेंजागासविस्तर॥ तेथेंगुप्तरूपेंकेला
बैसकार॥ तंवदिवसआलादोनप्रहर॥ पक्षीचाराघेवोनिआले॥ २०॥ केलेंसंध्यास्नान
॥सारिलिहरिहराचेंपूजनं॥ वैश्वदेवकागबलिदान॥ समर्पिताजालातेकाळीं॥ २१॥
काण्हींआहेकींकायमहानुभाव॥ दोनउत्तरें बोलिलापक्षिराव॥ तिसरेवचनीं [illegible]
संदेह॥ तंवच्यारुह्मणेमीआहें॥ २२॥ पक्षियेंजवळीपुत्रपाठविला॥ तेणेंवृक्षावरीउ
चलोनिनेला॥ षोडशोपचारेंपूजिला॥ आदरेंकरूनियां॥ २३॥ अन्नवाढिलेंहंसकांतें॥
ब्रह्मार्पणहंससोडित॥ समर्पूनिचित्रगुप्तातें॥ आपोषणघेतलें॥ २४॥ च्यारुनघेआपोश
ना॥ पक्षीकरितीविज्ञापना॥ ह्मणेकांहींकरावीआज्ञा॥ तेमीकरीनशीघ्रकाळें॥ २५॥ च्या

च रुह्मणोचित्रकुटान्यावें॥ मागुतेंयेथेंआणावें॥ इतुकेंतुवांआंगिकारावें॥ आणीकनाहींकाम अ
२ ना॥ २६॥ हंसह्मणेकार्यस्वल्प॥ प्रभातींकरूसकल्प॥ आनंभोजनकरींसांडींविकल्प॥ १३
हेंषचनसत्यमाझें॥ २७॥ मगआपोशनघेताजाला॥ रूक्मांगदसजेविला॥ आंचवोनीविडा
घेतला॥ मगसांगेवृत्तांत॥ २८॥ ऐसीक्रमिलीतेराती॥ उदयपावलागभस्ती॥ हंसह्मणे
पुत्राप्रती॥ कोणआजिस्वर्गाजातसे॥ २९॥ मगतोह्मणेज्येष्ठपुत्रातें॥ न्यारुशीन्यावेंसांगा
तें॥ मागुतीआणावेंयेथें॥ फिरोनयेतेसमर्थी॥ ३०॥ तेणेंबैसविलेंपृष्ठावरी॥ उड्डाणकेलेंअं
बरीं॥ चित्रकुटापातलेसत्वरी॥ तेथेंन्यारुउतरला॥ ३१॥ राजहंसचालिलापुढारा॥ ह्मणे
फिरोनयेईनदुपारां॥ तंववत्सांअवलोकूननगरा॥ येथेंवाटपाहावी॥ ३२॥ तोउडोनिगेलात्वरीत
॥ न्यारुनिघालाचित्रकुटांत॥ सर्पोवतेंअसेपाहत॥ हाटवटियाचौवारें॥ ३३॥ न्यारुजंवल
क्षीजनां॥ तंवऐसिनाहींचेतना॥ टकमकपाहातीएकमेकाचियावदना॥ परीसत्वनाहींश
रीरीं॥ ३४॥ व्यवसावकरीतहोतेहोआपले॥ एकउभेएकबैसले॥ देतांघेतांकरउचलले
॥ तैसेंचराहिलेअसती॥ ३५॥ एकहोतेभोजनकरीत॥ मुखींहोतेग्रासघालित॥ स्त्रिया·
होत्यावाढित॥ त्यातैशातटस्त्दिसती॥ ३६॥ एकअंधकामातुर॥ आपुलालेठाईंतसर॥ अष्टां
गेंएकाकार॥ तैसेंचउभयतांअसती॥ ३७॥ ऐसीअवरापकडजाली॥ आपुलालीकायस्थिती २
॥ जेजयाचीहोवृत्ती॥ तैसेंनेंचिमोन्यरूप॥ ३८॥ तेनपाहेचालेपुढारा॥ आलाअसेमध्यवा

जारा॥ तेथें देखिल्या अप्सरा॥ नृत्यतां उर्वी उभ्या असती॥ ३९॥ लोकांचें देखूनि सत्व मंद॥ च्यारूनें आदरिला विनोद॥ एकाचा करोनि उच्छेद॥ एकावरी लोटित असे॥ ४०॥ वाणियांचीं खजूर खोबरीं॥ चाटियाची लुगडीं हारी॥ चित्रविचित्र नानापरी॥ तेलातुपाची फोडी पात्रें॥ ४१॥ पुढें गेला नाणवटीसी॥ देखिल्या द्रव्याचा रासी॥ त्या एकाच्या एकासी॥ टाकित सैंपें॥ ४२॥ तंव देखिलें बुकेकरिया॥ धांवोनि उघाडिल्या पेटिया॥ अंगीं परिमळ चर्चुनियां॥ घाली गळां सुमनमाळा॥ ४३॥ तेथूनियां निघाला॥ महाद्वारा पावला॥ द्वारपाळ होता बैसला॥ तोंड धलाटा कोनियां॥ ४४॥ भीतरी जंव निघाला॥ तंव स्त्रिया देखता जाला॥ कोणही निद्रस्त कोण्ही बैसल्या॥ अतिलावण्य सुंदरी॥ ४५॥ तेथें एक केली रळी॥ कोण्हा चुंबन कोण्हाचें यौवन चोळी॥ कोण्हासि चंदन परिमळी॥ लाविता जाला॥ ४६॥ तेथें कमला एक क्षण॥ पुढें ठेविलें ठ्जम भुवन॥ चित्रविचित्र नगरी पूर्ण॥ हिरेमाणिकें जोडिलीं॥ ४७॥ त्या मंदिराभीतरीं॥ मंचक घातला सेकुसरी॥ रत्नें जोडिलीं नानापरी॥ नयावरी रूपयौवन उत्तमा॥ ४८॥ पासोडि शफ्त्रसेलियाचा॥ चांदवा बांधिला खुमासि॥ जडीत लखलखीत कोंदुणाचा॥ लाविले घोंस मुक्ताफळांचे ४९॥ चहूं कोनीं चारी समया॥ चहूं माचव्या च्यारि पुतल्या॥ दोघी देती पैं विडीया॥ आपलें स्वइच्छे करुनी॥ ५०॥ उश्याकडे दोघी असती॥ चामरें मक्षिका वारिती॥ मध्यें निद्राभूत स्त्री असती॥ तेही निर्जीव दिसतसे॥ ५१॥ तीस पांघरवीला क्षिरोदक॥ तो च्यारूनें उघडिला तात्काळी

च· काा अवलोकी घोटेपासूनमस्तका॥ ह्मणे कोण लावण्य तारुण्याची॥ ५२॥ वीमंसे धातयासे जालें अ·
३ कष्ट॥ अवघेंसुंदरत्व मिळोनियेकवट॥ हें घडविलें असे बरवंट॥ ऐसें मज गमन से॥ ५३॥ जैसें ई ४३
वेंस्वरूप॥ तैसेंच चक्रदंतकन्येचें रूप॥ कांहीं घडला असे शाप॥ हें यथार्थ जाणवलें॥ ५४॥ चार्ळीलु
गर्डीशफज्रचोरवट॥ कांस घातली असे बळकट॥ लल्हार्टी असे कस्तूरीमळवट॥ वदनीं तांबूल सु
रंग॥ ५५॥ ऐसी पावली अवघी खुण॥ पुनरपी घातलें पांघरूण॥ बरवें झांकिलें करचरण॥ मग
निघाला मंदिराबाहेरी॥ ५६॥ चालिला दुसरीया बाजारीं॥ दोहीं भागीं माडियागोपुरीं॥ तेथें
बैसले असती व्यवहारी॥ आपलिया परिवारेसीं॥ ५७॥ कोणी बैसले असतो समवेत॥ तांबू
ळविडिया एकमेकां देत॥ एक आंगीं चंदन लावित॥ करे तिच्या कुचाग्रीं लावोनी॥ ५८॥ एक
करिती चरणक्षालण॥ येकीं केलें असे शयन॥ एक उभ्या असती ताठा धरूनी॥ पुरुषकरीं धरू
निवोढती॥ ५९॥ ऐसा विचारविनोद॥ पाहिला सकळनगराचा भेद॥ कळया केल्या विनोद॥
मग च्यारू आला नगराबाहेरी॥ ६०॥ श्रोते ह्मणती एक असपुसण॥ हा जन निर्जीव असे कवणे
गुणें॥ इतुकें विभांडिलें च्यारुनें॥ परी त्याचें कानन चलेची॥ ६१॥ ऐसें ऐकोनी कवीश्वर॥ ह्मणे बरवें
पुसिलें प्रश्नोत्तर॥ तरी मी सांगेन सविस्तर॥ थोर ह्रदयीं आनंदला॥ ६२॥ ह्मणे परिसा एकचित्तें
चित्रांगीच्या जिवीं नगरजित॥ सकळ जनासि तिचें सत्व॥ दुसरा भाव असेना॥ ६३॥ तीस इंद्र- ३
शाची कडाडी॥ ह्मणोनि देह सोडीतां तडी॥ जनना हातट होतें परवडी॥ तैंतें सेचनिस्तेज जाहा
ले॥ ६४॥ जैसा कृष्ण द्वापारी॥ भिल्लें चरणीं विंदिला गंगातिरीं॥ बोलावू पाठविलें ते अवसरी॥

पांडुचियासत्तासी॥ ६५॥ धर्महस्तनापुरींराहिला॥ अर्जुनापाहावयाधाडीला॥ तोतोमंत्रउपदेशके
ला॥ जेआधारनघावाकृष्णासी॥ ६६॥ अर्जुनआलावेगवगत्र॥ कृष्णेंदेखिलेंतयासीयेतें॥ दुःखें
रुदनफारकरीत॥ आणिललाटपिटितसे॥ ६७॥ गडबडांअसेलोळत॥ जवळीबोलावीकृष्णानं
थ॥ ह्मणेनावेकदेईहात॥ उठोनिमगबैसेन॥ ६८॥ तोशब्दअर्जुननघेचित्तीं॥ देवयेनसेकाकुळ
ती॥ ह्मणेमीरक्षिलाअसेकोणगती॥ अंतींआधारहोसीह्मणोनी॥ ६९॥ अगायेपांडुनायका
देनकोयेऊआह्माजवळिका॥ धनुष्याचातरींदेईटेका॥ अर्धानिमिष्यप्रमाण॥ ७०॥ किरीटीदे
धनुष्यहातीं॥ हरीनेंहरिलीसर्वशक्ति॥ प्राणटाकिलात्वरीतगती॥ गेलाविष्णुभुवना॥ ७१
पांडवजालाशक्तिहीण॥ कृष्णगेलावैकुंठभुवना॥ मागेंअंतःपुरींभांडतीजाणा॥ तेंअर्जुन
पाहातसे॥ ७२॥ भीमार्जुनाचेंकांहींनचले॥ तैसेंयांचेंसर्वचित्रांगीनेंनेलें॥ च्यारूनेंजेंविप
रीतकेलें॥ तेंफावलेंतयासी॥ ७३॥ श्रोतेसमक्षापुरविलीह्मणती॥ पुढेंकथेर्चासांगव्युसत्ती
करीह्मणेपरिसावेंसावचित्तीं॥ भजवरीकृपाकरोनी॥ ७४॥ च्यारुमार्गंधरोनिबैसला॥ तंव
पक्षीचाराघेवोनिआला॥ तेणेंपृष्ठीवरीबैसविला॥ वेगींपावलावटवृक्षीं॥ ७५॥ राजहंसेंपूजि
लाच्यारु॥ बहुकेलाआदरु॥ तेदिवशींतेथेंजालास्थिरु॥ प्रभातेंकेलेंप्रयाण॥ ७६॥ आलाब
द्रिकाश्रमासी॥ नमस्कारकेलाश्रीगुरुसी॥ ह्मणेतुझियाकृपेनेंस्वर्गासी॥ पाहूनिआलोंस्वा
७७॥ तेदिवसींतेथेंराहिला॥ प्रभातेंगुरूसनमस्कारकेला॥ आज्ञाघेवोनिपावला॥ नागपु

शेसी॥ ७८॥ भेटला चक्रदंतासी॥ क्षेमालिंगन दोघांसी॥ पाठविलें कुमारीपासी॥ जासांग देखिलीवार्त्ता॥ ७९॥ तो आला सेत्वरीत॥ दोघे बैसली एकांत॥ पुसती जाली वृत्तांत॥ चित्रकुटीचा पें॥ ८०॥ मूळद्वारापासून सांगीतलों॥ मंदिरांत निघालों ह्मणतलें॥ खूण मानतां येरी नें वर्जीलें॥ आतां पुढें न सांगावें॥ ८१॥ ह्मोते ह्मणती सांगतां सांगत॥ वर्जिलें हें काय निमित्त॥ कवी ह्मणे आईका देवोनि चित्त॥ तें हीं सांगेन तुह्मासी॥ ८२॥ संपूर्ण वार्ता होतां जाण॥ तिचें होईल शापमोचन॥ हि बुद्धि योजिली तिणें॥ यासि सौरख्य दिधलें पाहिजे॥ ८३॥ या निमित्य पुढील वृत्तांत॥ पुरवावया काम भोगार्थ॥ इतका विचारोनि परमार्थ॥ काय करिती जाली॥ ८४॥ मग बोलाविलें पितयासी॥ ह्मणे लग्न लावावें च्यारु र्सी॥ आळस रहित वेगेसीं॥ उठिला नृपनाथ॥ ८५॥ पहिलीच केली होती सामग्री॥ लग्न पाहिलें वेग वगत्रीं॥ ऋषी मेळवोनि पवित्रीं॥ लग्नतिथी निर्धारली॥ ८६॥ आजि मुहूर्त्त असे गजेंद्रा॥ संपूर्ण असे प्रतिपदा॥ उभयतां लावावी हरिद्रा॥ ऐसें द्विज बोलिले॥ ८७॥ राजा प्रधाना सांगे परवडी॥ तुह्मी व्हावें नवरीयाचे वऱ्हाडी॥ करावें गेंजी तांतडी॥ लग्न कार्तिक शुद्ध पंचमीसी॥ ८८॥ प्रधानानें नेलें च्यारु र्सा॥ हळदी लाविली गजरेंसी॥ राजगृहीं कुमारीसी॥ केला हळदी महोत्सावो॥ ८९॥ ऐसे क्रमले तीन दिवस॥ देवकस्थापन चतुर्थीसा॥ येरे- दिवसीं घटिका एकविस॥ लग्न लाविलें रात्रिसमयीं॥ ९०॥ थोर जाला आनंद॥ वाजं-

त्यांचा एकनाद ॥ ब्राह्मण पढती मंत्रशब्द ॥ जो विधि बोलिला होता ॥ ९१ ॥ बरवे क्र
मले चारी दिवस ॥ सांडे जाले यथावकाश ॥ आंदणा दिधलें जांवयांस ॥ अर्धराज्य आ
णि उपदेश ॥ ९२ ॥ त्यारू आणि राजकुमारी ॥ नांदती बरवियापरी ॥ जरी सांगों विस्त
रीं ॥ वृथा ग्रंथ वाढेल ॥ ९३ ॥ असती सकळ संपदा ॥ सुखसंपदेशि नाही मर्यादा ॥ ह
रिभक्ती ठाईं सदा ॥ नाहीं निंदा कोणाची ॥ ९४ ॥ ऐसे क्रमिले बहुत दिवस ॥ अतिप्रीती
दोघांस ॥ मनीं आठविलें चित्रांगीस ॥ करिती जाली उपदेशातें ॥ ९५ ॥ तंव कोण्हे दि-
नांतरीं ॥ दोघें असतां सुखसेजारीं ॥ रात्रीं च्या अवसरीं ॥ वार्त्ता पुसे उरली चित्रकुटी
ची ॥ ९६ ॥ सांगे कथा पुढील सविस्तर ॥ ह्मणे मी प्रवेशलों मंदिरांत ॥ तंव मंचकीं पहुड
ली सुंदर ॥ मग मी जवळी गेलों ॥ ९७ ॥ त्यारू असे सांगत ॥ चित्रांगी हुंकाऱ्या देत ॥
संपूर्ण परिसोनि वृत्तांत ॥ सांडिला प्राण पैं तेथें ॥ ९८ ॥ त्यारू ह्मणे इला लागली निद्रा
॥ ह्मणोनि हालाविली सुंदरा ॥ तंव निर्जीव त्वते अवसरा ॥ खोड वळले शरीराचें ॥ ९९ ॥
मग उठिला खडबडोनी ॥ तेणें केली दीर्घध्वनी ॥ काय गजर जाला ह्मणोनी ॥ धांवत
आला चक्रदंत ॥ १०० ॥ त्यारू सांगे सविस्तर ॥ दृष्टि पाहे नृपवर ॥ हाहाकार केला थोर ॥
राणी सुख्य करोनियां ॥ १ ॥ करिती महाशोक ॥ एकापरीस एक अधिक ॥ मिळाले सोई
रे सेवक ॥ कांहीं चि तेथें न दिसे ॥ २ ॥ हा अवघा सकळ मृत्यलोक ॥ मायामृगजळवत मा

विक॥अल्पआयुष्यमृत्युलोक॥याचाभरवंसाकायसा॥ ३॥ह्मणोनिग्रंथानकरीपसर॥क
रितेजालेअग्निसंस्कार॥ऱ्यारुकरीक्रियाअपार॥बारातेरादिवसलोटले॥ ४॥चित्रांगी
चाप्राणानिघाला॥तोचित्रीकुलापावला॥आपुलेस्वकुडींसंचरला॥जनजालेसजीवपें॥
५॥आपल्याव्यवसायातें॥स्वधर्मजालेचालविते॥ऱ्यारुनेंविप्रांडिलेंहोर्षें॥तेवोळखती
एकमेका॥ ६॥माझेंतुझेंह्मणोनी॥खेळतीझोटधरणी॥सांगतीचित्रांलागोनी॥तेकरि-
तीन्यायनीती॥ ७॥कथितीमागीलविचार॥ह्मणेयेकआलाहोतातस्कर॥तेणेंअन्याय
केलाथोर॥येकाचेंयेकालाविलें॥ ८॥चित्रांगीसमाधानकरीजगातें॥हरिलेंवित्तदेवधीत-
याचें॥इतुकेंकर्त्तव्यचित्रकुटीचें॥ऐकाकांचनपुरीचाकायविचार॥ ९॥मगह्मणतोजालाच
क्रदंत॥ऱ्यारुह्मणेमीजाईनस्वग्रहातें॥राजाविनवीआदरेंबहुतें॥ह्मणेदुसरीकन्याअंगी
कारी॥ ११०॥देईनअर्धराज्य॥सांभाळावेंजीमज॥तेणेंघडेलतुज॥पुण्यआणीपुरुषार्थ
॥ १११॥ऱ्यारुह्मणेनघडेसर्वथा॥मजनाहींस्त्रीचीआस्था॥आणिनलगेराज्यअर्था॥चा
डनाहींकासयाची॥ ११२॥पुन्हाचक्रदंतह्मणे॥कन्येचेंदुःखयेणेंगुणें॥तूंगेलियाशतगुणें
दुःखदुणेंहोईल॥ ११३॥तोनाईकेचिगेला॥रावअतिदुःखातेंपावला॥पुढेंकायवृत्तांतवर्त्त
ला॥तोसांगरेहरिदासा॥ ११४॥ ॥इतिश्रीविक्रमचरित्रे॥चित्रांगीआख्यानत्र
योदशप्रसंगः १३॥ ॥ श्री ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः ॥ चारुआलाकेदारासी ॥ भेटताझालाश्रीगुरूसी ॥ तेथेंक्रमिलीतीनि
शी ॥ तंवउदयकेलादिनकरें ॥ १ ॥ प्रभातींचारुउठिला ॥ गुरूंसिनमस्कारकेला ॥ आज्ञापुसो
निनिघाला ॥ आलाराजहंसाजवळी ॥ २ ॥ तेणेंकेलेंनमन ॥ झालेंसंध्यास्नानभोजन ॥ रात्रीं -
पावलाविश्रांतिसदन ॥ तंवउजळलीपूर्वदिशा ॥ ३ ॥ हंसेंबैसविलापृष्ठावरी ॥ उतरविला
चित्रकूटाच्याद्वारीं ॥ प्रवेशलानगराभीतरीं ॥ तंवतेथेंकायवर्तलें ॥ ४ ॥ पूर्वींकेलाहोताआ
ट ॥ नगरजनींधरिलाबळकट ॥ ह्मणतीघ्यावेंउसणवट ॥ बरवाआजिसांपडला ॥ ५ ॥ ए
कमारितीपृष्ठावरी ॥ एकओढितीचाचरी ॥ एकह्मणतीनेऊंराजद्वारीं ॥ करावेंताडण ॥ ६
॥ नगरजनमिळालेउदंड ॥ एकबोलबोलिलेंदुर्घट ॥ चित्रांगीसह्मणतीकरावादंड ॥ यात
स्करासी ॥ ७ ॥ चारुचित्रांगीनेओळखिला ॥ ह्मणेथोरअनर्थझाला ॥ मीदंडनयातस्क
राला ॥ तुह्मींआतांपरतावें ॥ ८ ॥ जनअवघेगेलियावरी ॥ चारुनेलामंदिराभीतरीं ॥ चर
णाझाडीतयेअवसरीं ॥ विरगुंठिसोडोनियां ॥ ९ ॥ ह्मणेकष्टलेमजकारिनां ॥ जिवींकांहींन
करावीव्यथा ॥ विचारूनियांपरमार्था ॥ समाधानमानावें ॥ १० ॥ ऐसीनानाकरुणावचनीं ॥
विनविताझालीमृगनयनी ॥ ह्मणेक्षमाकरामजलागोनी ॥ पुढेंउभिराहिलीअसे ॥ ११ ॥ आं
गींचर्चिलेंबावनचंदन ॥ विद्याधरीजाणविती विजणे ॥ पुष्पमाळाघालितीजाण ॥ विडा १
देतचित्रांगी ॥ १२ ॥ तंवमावळलारवि ॥ सेजकेलीपैंबरवी ॥ उपभोगेंचारूसरंजवी ॥ दावी

आपलीकुशलता ॥१३॥ तेंसुखठाउकें अनुभवियासि ॥ कित्तीह्मणोनिद्यावीसाक्षिसी ॥ म
र्यादानाहींत्यासुखासी ॥ तंवप्रातःकाळझाला ॥१४॥ ऐसीदिवसादिवसाप्रति ॥ अधिका
अधिकवाढवीप्रीती ॥ नगरजनआश्चर्यकरिती ॥ शंकतीआपुल्याठायींपैं ॥१५॥ तीनमा
सक्रमिलियावरी ॥ तंवकोणेंएकेदिनांनरीं ॥ चारुआणिचित्रांगीसुंदरी ॥ करींकरधरूनि
फिरतहोतें ॥१६॥ तंवउपरिदेखिलासमरवर्णी ॥ चालपाहोंह्मणेनयनीं ॥ केसीआहेह्मणे
ठेवणी ॥ खणोखणीचीपैं ॥१७ माडीवरीवळंघलात्वरित ॥ खणोखणीरत्नेंशोभत ॥ तगट
वर्णलखलखित ॥ सोनियांचीसाजिरी ॥१८॥ सातहीखणपाहिले ॥ शिखरावरिवळंघलें ॥
तंवनयनींदेखिलें ॥ अतिस्थूळभेरीतें ॥१९॥ भेरीत्राटिनह्मणेचारु ॥ चित्रांगीह्मणेएकविचा
रु ॥ वाझवितांऐकेलवज्रधरु ॥ तोबोलावूंधाडील ॥ २०॥ भिकविलेंनाइकेचित्रांगीचें ॥ त्राटण
केलेंभेरीचें ॥ मनसंतोषलेंवज्रधराचें ॥ हांकारिलेदूतांसी ॥२१॥ ह्मणेजाबोलावाचित्रांगी ॥
दूतआलेमनोवेगीं ॥ ह्मणतीचालवोनृत्यालागीं ॥ इंद्ररायेंबोलाविलें ॥२२॥ उपरिवरूनउ
तरलीत्वरित ॥ चारूसजाणवीदूतांचीमात ॥ ह्मणेमीजयालागींहोतेंभ्रांत ॥ तेंचिघडोनिपैं
आलें ॥२३॥ ह्मणेजातुह्मीराहावेंमंदिरीं ॥ मीजाईनदूतांबरोबरी ॥ नमस्कारकरोनीशेंलारी ॥
सत्वरयेथेंयेईन ॥२४॥ तोह्मणेमीयेईन ॥ दृष्टीपाहेनइंद्रभुवन ॥ चित्रांगीह्मणेहोईलएकादें
विघ्न ॥ मगप्रयत्ननचलेकांहीं ॥२५॥ चित्रांगीकरीसमाधान ॥ चारुनायकेवचन ॥ मक्षिकाके

लीनरदेहपालटोन ॥ बैसविलास्तनावरी ॥ २६ ॥ मगगेलीइंद्रभुवना ॥ नमस्कारिलाइंद्रराणा ॥
राजपुसेक्षेमकल्याण ॥ ह्मणेकृपातुमचिस्वामियां ॥ २७ ॥ उत्तमकरींगेनृत्य ॥ टाळमृदंगवाद्यें
मिश्रित ॥ रागआळवीश्रीमंत ॥ थैंथैंशब्देंकरोनियां ॥ २८ ॥ भूमीसकेलेंदंडवत ॥ मगस्मरि
लाएकदंत ॥ देवादिकसमस्त ॥ उत्तमनृत्यपाहोंठेले ॥ २९ ॥ भवरिदेतांउल्हाळ ॥ नाचोंलागली
सप्तपाताळ ॥ झोकदेतांचुकलीताल ॥ तेंइंद्रेंदेखिलें ॥ ३० ॥ ह्मणेंताळचुकेघडीघडी ॥ तरीईंट
होसिलमारवाडीं ॥ साटयोजनेंपरवडी ॥ होवोनितुवांपडावें ॥ ३१ ॥ इंद्रेंदिधलाउग्रशाप ॥
चित्रांगीनेंहृदयींधरिलाकंप ॥ ह्मणेजीद्यावाउश्शाप ॥ कृपाकरोनियां ॥ ३२ ॥ ह्मणेतूंसकळांबंधु
॥ सेवकजनींकृपासिंधु ॥ माझासकळहीअपराधु ॥ क्षमाकरीस्वामियां ॥ ३३ ॥ ह्मणोनीचरणीं
ठेविलामाथा ॥ वज्रधरझालाश्रापदेता ॥ फोडोनिपिष्टकरितां ॥ उत्तमगतीपावसील ॥ ३४ ॥
ह्मणेजीवज्रपाणिश्रेष्ठ ॥ साठयोजनेइट ॥ तीकेंसीहोईलपिष्ट ॥ हेंमजअपूर्ववाटतसे ॥ ३५
॥ वज्रधरह्मणेवोमृगनयनी ॥ असत्यनव्हेमाझीवाणी ॥ संशयनधरावाअंतःकर्णीं ॥ उत्त
मदेहपावसील ॥ ३६ ॥ मगआज्ञापुसोनिनिघाली ॥ चित्रकूटींप्रवेशली ॥ थोरचिंताग्रस्तझा
ली ॥ तेव्हांविनवीचारुतें ॥ ३७ ॥ ह्मणेजीघडलेंअनुचित ॥ शापझालाकठिणबहुत ॥ नक
ळेचिपूर्वदत्त ॥ तैसीआठवेवासना ॥ ३८ ॥ चारुह्मणेचिंताकिमर्थ ॥ शंकरआहेजीसमर्थ ॥
व्यापकसर्वभूतमात्र ॥ तोबरवेंचिकरील ॥ ३९ ॥ ऐसेंकेलेंसमाधान ॥ सत्वरसारिलेंभोजन

तंवझालाअस्तमान॥निद्राकारितीउभयतां॥ ४०॥ प्राणसोडीचित्रांगी॥ चारुउठतैसाचिवेगीं जावोनिबैसलामार्गीं ॥वाटपाहेराजहंसाची॥ ४१॥ बरवामाध्यान्हकाळझाला॥ पक्षिचारा घेवोनिआला॥ चारूपृष्ठावरीबैसला॥ पावलेतेव्हांवटवृक्षा॥ ४२॥ जालेंभोजनयथारुची॥ आ ज्ञाघेतलीराजहंसाची॥ वाटधरिलीबद्रिकाश्रमाची॥ केलेंगुरुनमन॥ ४३॥ सकळवृत्तांतसां गीतला॥ गुरुह्मणेजाईमार्चाडदेशाला॥ तेथूनियोजनसोळा॥ नगरएकअसेपैं॥ ४४॥ भेटा वेंनृपवरासी॥ ह्मणावेंविघ्नउदेलेंतुझियादेशीं॥ क्षयआलातुझियाराज्यासी॥ कोणीनाहींसांग ता॥ ४५॥ ईटवादतीप्रतिदिनीं॥ तीफोडोनीटाकावीतत्क्षणीं॥ ऐसेंसांगोनीतयासीं॥ कार्यसाधा वेंआपुलें॥ ४६॥ गुरूचीआज्ञाघेवोनी॥ टाकोनीगेलापेणोपेणीं॥ ईटदेखोनीनयनीं॥ महावि शाळकृष्णवर्ण॥ ४७॥ तेथूनदक्षिणादिशेचालिला॥ जावोनिरायासिभेटला॥ मगवृत्तांतसां गीतला॥ अतिआदरेंकरोनियां॥ ४८॥ राजाह्मणेकोठोनिबिजेंकेलें॥ कार्यसांगावहिलें॥ चा रुह्मणेयेणेंजालें॥ बद्रिकाश्रमाहुनीं॥ ४९॥ जातहोतोंश्वेतद्वीपासी॥ दुस्तरउपजलेंतुझ्या देशीं॥ क्षयआलातुझेराज्यासी॥ तोमजदेखवेना॥ ५०॥ तुजकरावयाश्रवण॥ कोणहींनाहीं विवेकीमंत्रिजाण॥ येवढेंउद्भवलेंविघ्न॥ ईटमहाविशाळरूप॥ ५१॥ येथूनियोजनेंसोळा॥ ईटवाढलिसेभूपाळा॥ अतिप्रचंडविशाळा॥ काळकर्कटभयानक॥ ५२॥ तीजंवजंववाढे पावेल॥ तंवतंवतुझेंराज्यक्षयहोईल॥ हेंमजश्रुतझालेंसकळ॥ ह्मणोनिसांगावयाआ

 

ले॥५३॥राजाझालाभयाभीतथोर॥भाकितकरुणोत्तर॥ह्मणेहेंमहादुस्तर॥पराभवेलकैसेनी॥५४॥सांगावीतयाचीविवंचना॥ह्मणवोनिघालीलोटांगणां॥उपकारहोईलजाणा॥मजआठवणजन्मोजन्मीं॥५५॥त्यारुह्मणेएकाएक॥त्याचासत्वरप्रयत्नदेख॥ईटफोडावीतात्काळिक॥अन्यनाहीं दुसरा॥५६॥ह्मणेचलाआतांपाहूं॥निशाणींपेटिलाधावू॥मिळालेसैन्यसमुदाउ॥आणिजनसमस्त॥५७॥घेतलीखणतीकुदळ॥घणपाहरासबळ॥टांक्याहातवटियासबळ॥सर्वसामग्रीविस्तारें॥५८॥ईटदेखोनिनृपवर॥आश्चर्यकरीतेव्हांथोर॥बरवासांगीतलाविचार॥महाअरिष्टउपजलें॥५९॥कोपलाप्रधानजनासी॥ह्मणेकैसेंचालावतांराज्यासी॥येवढेंविघ्नउदेलेंदेशीं॥तेंतुह्मासीठाउकेंनाहीं॥६०॥फोडूंलागलेचहूंकडे॥पडतीइटेचेतुकडे॥जाणोंलोटलेविशाळकडे॥महापर्वताचे॥६१॥त्याचेंहीकरितीतुकडेकुट॥जाणोंजात्यानेंदळिलेंपीठ॥सैन्यउतरलेंघनदाट॥इटेसिनिकटमांडिला॥६२॥जैसीलंकावेढीलीवानरीं॥तयाचीसंख्याकोणकरी॥तेणेंरितीवेधोनिइटेवरी॥फोडितातिआनंदें॥६३॥ऐसाएकमासपर्यंत॥राजाराहिलाअसेतेथ॥वायुसुटलाअसेअद्भुत॥तेणेंधुरोळाउडविला॥६४॥ब्राह्मणजपतीपर्जन्यसूक्त॥मेघवर्षलाबहुत॥तेणेंगेलावाहत॥सिंधुजळासीपैं॥६५॥इटेचीजालीशांती॥चित्रांगीपावलीउत्तमगती॥आलीचित्रकुटाप्रती॥आपुल्यादेहींप्रवेशली॥६६॥इटेचासंव्हारु॥थोरआनंदजालाचारु॥राजामानिउप

कारू॥ ह्मणेबरवामंत्रसांगीतला॥ ६७॥ करितसेबहुतस्तुती॥ चारूसिह्मणेबालवींराज्यनि
ती॥ चौघेमाझेमंत्रीअसती॥ त्यांवरीहोवोनिराहे॥ ६८॥ चारुह्मणेजीनृपनाथा॥ मजनाहीं
यांचीआस्था॥ निरोपदेणेंसर्वथा॥ जाणेंअसेसेतुसी॥ ६९॥ हेंमहाथोरअरिष्ट॥ म्यांदेखि
लेंदुर्घट॥ तेणेंजालोंउत्कट॥ जेंतुझेंराज्यक्षेमअसावें॥ ७०॥ राजाविनवीबहुतांपरी॥ तुजसा
रिखानाहींपरोपकारी॥ धन्यधन्यजन्मलासिउदरीं॥ मातेचिया॥ ७१॥ कांहींदेवोंपाहेवस्त्र-
अलंकार॥ रथवारूआणिकुंजर॥ चारुनकरीअंगिकार॥ मागेआज्ञाजावयाची॥ ७२॥ जैसा
पर्जन्यमुसळधारी॥ इंद्रवर्षलागोकुळावरी॥ कृष्णेंधरिलागोवर्धनकरीं॥ रक्षिलेंगोकुळासी
॥ ७३॥ तैसेंरक्षिलेंआह्मासी॥ निवारिलेंमहाअरिष्टासी॥ दुजानाहींनिर्धारेंसी॥ तुजऐसा-
धर्मात्मा॥ ७४॥ चारुह्मणेम्यांकेलानिर्धार॥ त्याचामानसितूंउपकार॥ मार्गींदेखिलाविचा
र॥ तोविदितकेलापाहिजे॥ ७५॥ कविह्मणेऐसेंकरावेंकृत्य॥ आपलेंकार्यदुसरियासिवाटे
हित॥ करितांआपलास्वार्थ॥ परमार्थघडेइतरांसी॥ ७६॥ चारुतेथूनिनिघाला॥ राजाबोळ
वींतयाला॥ परस्परेंथोरजाला॥ आग्रहआणिनमस्कार॥ ७७॥ रावीफिरूनगेलानगरा॥ चा
रुपावलाकेदारा॥ भेटलावेगेंमुनीश्वरा॥ सांगेसकळवृत्तांत॥ ७८॥ गुरुथोरसंतोषला॥ ह्मणे
तूंआलासीभागला॥ आजिस्थिरावोनिप्रभातवेळा॥ गमनतुवांकरावें॥ ७९॥ तेंमानलेंचा
रूसी॥ ह्मणेतुझीआज्ञाशिरसि॥ मगक्रमिलीतेनिशी॥ प्रभातवेळापैंजाली॥ ८०॥ गुरूसि

व॰च॰ ४ केलेंदंडवत॥विजें केलें पैं त्वरित॥पावलामहेंद्रपर्वत॥वळंघला वटवृक्षावरी॥८१॥तंव आ अ॰ १४
लेतिघेपुत्र॥पाकजाळ सिद्धपवित्र॥भोजनींजालेतृ स॥क्रमिलीत्तेंनिशी॥८२॥मगउगव
लादिनकर॥राजहंसिबैसविलाप्रष्ठावर॥उत्तरिलाचित्रकूटावर॥आपणचालिलापुढा
रां॥८३॥श्रोतेतेव्हांप्रश्नकरित्ती॥ह्मणेआहेविज्ञप्ती॥पक्षीतरीसूक्ष्मदिसती॥चारुसीकें
सेंवाहिलें॥८४॥कविह्मणेश्रोतयातें॥हंसवाहेसारजेतें॥मयूरवाहेस्वामिकार्तिकातें॥प
क्षीसामान्यकेसेंह्मणावें॥८५॥ऐकासाक्षतिसरी॥चौदाभुवनेंजान्हेउदरीं॥तोकृष्णासवाहे
प्रष्ठावरी॥गरुडपक्षीकेंसामान्य॥८६॥आणीकऐकापक्षियाचीकथा॥ज्याहींपक्षविभांडि-
लाहोता॥तयाच्यियापुरुषार्था॥पारनाहींपा॥८७॥कार्यतरीस्वल्पहोतें॥तरीपक्षीकुळें-
मिळालींत्वरितें॥तेंपरिसावेंनिरुतें॥एकचित्तेंकरूनियां॥८८॥टिटवीपक्षिणीचींअंडीं
॥ठेविलींहोतींसमुद्रदरडीं॥तींटाकोनियांउघडीं॥दोघेंचाराआणावयागेलीं॥८९॥तंव
तेथेंबेडकीआली॥आंडींघेवूनिगेलीतात्काळीं॥ठेविलींआपुलेगृहमंडळीं॥भक्षावयाका
रणें॥९०॥पक्षिणीचाराघेवूनिआली॥आपलीआंडींपाहोंलागली॥मगह्मणतीकोणहीं
नेलीं॥पाहातीसिंधुतिरीं॥९१॥पाउलेंदेखिलींबेडकीचीं॥स्तुतिकरितीसिंधुची॥ह्मणति
अंडींदेववीं आमचीं॥नाहींतरींबरवेंनव्हे॥९२॥तोनाइकेचित्यांतें॥तंवसंतापलेंमनटिटि ४
वीचें॥ह्मणतीशोषणकरूंसमुद्राचें॥उदकचुंचूभरोनिटाकिती॥९३॥अहंताधरोनिमान

सीं॥ ह्मणती कोरडें करूं सिंधूसी॥ तंव तेथें आला नारद ऋषी॥ तयासी सांगती वृत्तांत॥ १४
तो ह्मणे बरवी सांपडली संधी॥ जाली असे कार्यसिद्धी॥ कळीला ऊं पक्षियाज ळाब्धी॥ ह्मणो
नि निघाला त्वरित॥ १५॥ प्रथम गेला लंकेसी॥ सांगीतलें समस्त पक्षियांसी॥ ह्मणे गांजिलें
तुमचिया कुळांसी॥ नदीश्वरें जाणपां॥ १६॥ सांगे अवघा वृत्तांत॥ ह्मणे तुमचा काय पुरुषार्थ
॥ जन्म नुमचें जालें व्यर्थ॥ नपुंसका हून हीनपें॥ १७॥ पीडित असे तुमचे कुळासी॥ काय पा
हातां निश्चयेसी॥ धांवा धांवा ह्मणे पक्षियांसी॥ आपलाल्या प्रतापें॥ १८॥ तुमचिया पुढें॥
समुद्र काय सें बापुडें॥ मीन मगर मत्स्य कुळें॥ भक्षावीं वेगीं॥ १९॥ आयकोनि धांविन्नले स-
कळ॥ अपार पावलें पक्षिकुळ॥ वेष्टिलें सें सिंधुजळ॥ सुटला पळ जळचरांसी॥ १००॥ तेथून
निघाला नारद ऋषि॥ गमन केलें तिहीं लोकांसी॥ श्रुत केलें पक्षिकुळासी॥ पक्षि चालिले-
अपार॥ १॥ रावे सांळुख्या घुबड॥ वहिरी ससाणे रगड॥ बक हंस गरुड॥ डोंब गिध असंख्यां
त॥ २॥ लावे चिडया तितुर॥ बळि आणि चकोर॥ बडवागुळें भयंकर॥ कोकिळा सुस्वरें पेंगा
ती॥ ३॥ वल्लव आणि पेंहोले॥ सिवणी आणि काउळे॥ कोकिरा कन्हाक कुरवाळे॥ अति आनं
दें करूनि यां॥ ४॥ हंस बकचा वास॥ नुन्या पारव बहु वस॥ काक दुवे संतोष॥ भक्षावया धांवती म
त्स्यांतें॥ ५॥ कैटीत्यें उडताति आकाशीं॥ बुडि मारूनि गिळीत मत्स्यांसी॥ बका हर्ष मानसीं
सकळ पासे गिळिताति॥ ६॥ शाह्म मृग शार्दूळ॥ महापक्षि गोळांगुळ॥ सत्वर पावे सिंधुज

वि. व ५

ऊ॥ भक्षावयामत्स्यांतें॥ ७॥ युद्धमांडिलेंपक्षियांसी॥ आणितयांजळचरांसी॥ अतिआ
नंदनारदासी॥ संडीतडाडीकृषिची॥ ८॥ पक्षियांचासांगेनविस्तार॥ तरीग्रंथवाढेलपसार
॥ एकमेकांचेंशरीर॥ दशद्वादशयोजन॥ ९॥ संग्राममांडिलाघोर॥ सिंधूवेंतेव्हांआटलेंनिर
॥ मीनआणिमगर॥ अतुरबळियेभिडती॥ १०॥ विरुळआणिकिरळ॥ बेडूकआणिकू-
र्मसबळ॥ नाडेसावजाविशाळ॥ भयानकगडवडती॥ ११॥ पक्षिबुडियामारिती॥ मीनउ
साळेह्मणिती॥ पक्षीभक्षावयाधांवती॥ बळेंवोढितीबाहेरी॥ १२॥ टिपारिलावितीबळें॥ प
क्षीफोडितीडोळे॥ पाईंह्मणोनिटकोळे॥ करितीवेगळेकरचरण॥ १३॥ मगमहाविशाळ-
रूप॥ पक्षिह्मणोजातीझडप॥ मगरगिळितीसाक्षेप॥ मगपक्षिसरसावले॥ १४॥ मगर
मातलेबळवृद्धी॥ तयावरीजटायुउतरलेशीघ्रगती॥ छेदोनिपाडिलेचरणक्षितीं॥ केलीशां
तिमगराची॥ १५॥ तंवउठावलीनाडेसावज॥ तयावरीपडिलागरुडराज॥ तेथेंझालेंथो
रझुंज॥ अधिकबळखगेश्वराचें॥ १६॥ अधिकबळपक्षियांचें॥ संव्हारणकेलेंजळच
रांचें॥ उदकशोषिलेसिंधुचें॥ पळालेमीनमगर॥ १७॥ बेडुकटरटरागर्जती॥ तेणें-
अंबरीटाहाउठती॥ पक्षीचरणींविदारिती॥ आंडींगिळतिबेडकांची॥ १८॥ कित्येक-
मर्मीझोंबिन्नले॥ तेसगळेचिगिळिलें॥ ह्मणतीबरवेंसांपडलें॥ पक्षिभयसमर्थहो॥
१९॥ संग्रामजालातुंबळ॥ तेणेंखवळबळिलेंसिंधुजळ॥ घोरमांडलाहलकालोळ॥ अति

आनंदपक्षियांसी॥ २०॥ एकगातीएकनांचती॥ एकहर्षेंहुमण्याघालिती॥ एकथाक थैथैतोंडिती॥ दंतशब्देंकरुनियां॥ २१॥ ऐसाजालारणकंदु॥ तेणेंभयाभितजालासिंधु॥ ह्मणेकायजालारणकंदु॥ तोसांगामुखवचनीं॥ २२॥ पक्षीह्मणतीतूंकोणब्राह्मण॥ येरुह्मणेमीसमुद्रजाण॥ नकरितांविरुद्धविवंचन॥ कांसंव्हारिलेंजळचरांसी॥ २३॥ पक्षी ह्मणतीतूंमूर्खदुर्बुद्धी॥ पूर्वींकेलीपरशरामासिंकुबुद्धि॥ तेणेंहेंपळविलामसिद्धी॥ केलें नौदानळकोंकण॥ २४॥ आतांकेलेंतैसेंची॥ अंडींनेलींटिटिवीचीं॥ शुद्धिवेगींकरीतयां चीं॥ नाहींतरींजळसांडुनिपळावें॥ २५॥ अंडींनेलींहेंमजनाहींश्रुत॥ शोधकरितोंमीनि श्चित॥ तोंवरीनिश्चळराहवेंयेथ॥ जळचरांनभक्षावें॥ २६॥ पक्षीवर्जितीजळचरकुळ॥ सि धुप्रवेशलाजळ॥ जळचरेंबोलाविलींसकळ॥ करितीशोधअंड्यांचा॥ २७॥ त्यांहींकेलें- शोधन॥ बेडकुळीआणिलीधरून॥ समुद्रआलाअंडीघेऊन॥ तींदिधलींटिटाविसी॥ २८ समुद्रह्मणेगरुडासी॥ मजनकळतांयुद्धतुह्मांआणिजळचरांसी॥ हाविषादनधरावामान सीं॥ ह्मणूनिगौरवितजाहाला॥ २९॥ दिधलींवस्त्रेंअलंकार॥ जेमुख्यनायकथोरथोर ॥ त्यांसिंकरोनिनमस्कार॥ बोळविताजाला॥ ३०॥ पक्षिगेलीयाआपुल्याठायांसी॥ टिट वीराहिलीआपुल्यादराडिसी॥ कविह्मणेश्रोतयांसी॥ ऐसाप्रतापपक्षियांचा॥ ३१॥ चारुतें कायबापुडें॥ ज्याणेंपर्वतावरीठेविलेंखडे॥ मगत्यासिनेतांकायकोडे॥ असेंअलक्षहंसासी ३२

